(KHUTBAT : Part 4 - Zakat)

# प्रवचने

## भाग - ४

# जकात


लेखक

मौ. सय्यद अबुल आला मौदूदी

भाषांतर

प्रो. मुबारक हुसेन मनियार

# जकात



# जकात

## (संपत्तीवर अडीच टक्के प्रमाणे वर्षातून एकदा दिले जाणारे दान)

## जकातचे महत्व

इस्लामी बंधुनो! नमाजनंतर इस्लामची सर्वात मोठी विधि– जकात आहे. सामान्यपणे ज्याअर्थी उपासनासंबंधी नमाजनंतर उपवासाचे नाव घेतले जाते त्याअर्थी लोक असे समजू लागले आहेत की नमाजनंतर उपवासाचा नंबर आहे. परंतु पवित्र कुरआनवरून आम्हाला असे ज्ञात होते की इस्लाममध्ये नमाजनंतर सर्वात अधिक महत्व जकातचे आहे. हे ते दोन महान स्तंभ आहेत ज्यावर इस्लामची इमारत उभी आहे. हे दोन्ही निसटल्यास इस्लाम टिकून राहू शकत नाही.

## जकातचा अर्थ

जकातचा अर्थ आहे पावित्र्य व स्वच्छता. आपल्या संपत्तीपैकी एक भाग गरजू व गरिबांसाठी वेगळा काढण्याला जकात अशासाठी संबोधले गेले आहे की अशाप्रकारे माणसाची संपत्ती आणि त्या संपत्तीबरोबरच स्वतः माणसाचे हृदयदेखील पवित्र बनते. जो मनुष्य अल्लाहने प्रदान केलेल्या संपत्तीतून अल्लाहच्या गुलामांचा

हक्क बाजूला काढीत नाही, त्याची संपत्ती अपवित्र आहे आणि त्या संपत्तीबरोबर त्याचे मन सुद्धा अपवित्र आहे कारण त्याच्या मनात कृतघ्नता भरलेली आहे. त्याचे मन इतके संकुचित, इतके स्वार्थी, इतके धनपूजक बनलेले आहे की ज्या अल्लाहने त्याला त्याच्या खऱ्या गरजेपेक्षा अधिक संपत्ती देऊन उपकृत केले. त्याच्याच उपकारांचा हक्क अदा करताना सुद्धा त्याचे मन दुखते. अशा माणसापासून काय आशा केली जाऊ शकते की तो जगात एखादे तरी पुण्य कार्य अल्लाहसाठी करू शकेल किंवा एखादा त्याग करणे सुद्धा केवळ आपल्या धर्म व श्रद्धेसाठी तो सहन करू शकेल? म्हणून असल्या माणसाचे मन सुद्धा अपवित्र आणि त्याने अशा प्रकार गोळा केलेली संपत्ती सुद्धा अपवित्र आहे.

## जकात एक परीक्षा

महान अल्लाहने जकात अनिवार्य करून तो प्रत्येक माणसाची परीक्षा घेत आहे. जो मनुष्य स्वखुशीने आपल्या आवश्यकतेपेक्षा अधिक असलेल्या संपत्तीतून अल्लाहचा वाटा काढतो व त्याच्या गुलामांच्या दरम्यान वाटून त्यांना मदत करतो, तोच अल्लाहचे काम करणारा आहे आणि तोच ईमानधारकांच्या जमाअतीत गणना करण्यास योग्य आहे. आणि ज्याचे मन इतके संकुचित आहे की इतका लहानसा त्यागदेखील जगाधिपती अल्लाहसाठी सहन करू शकत नाही तो अल्लाहसाठी कुचकामी आहे. तो कदापि यास लायक नाही की त्याचा ईमानधारकांच्या जमाअतमध्ये समावेश केला जावा. तो तर एक कुजलेला अवयव आहे ज्याला शरीरापासून वेगळा करणेच अधिक श्रेयस्कर आहे नाहीतर तो संपूर्ण शरीर कुजवून टाकील आणि हेच कारण आहे की पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर जेव्हां अरबस्तानातील कांही टोळ्यांनी जकात देण्यास नकार दिला तेव्हां हजरत अबू बकर सिद्दीक (रजि.) यांनी ते नमाज पढत असूनदेखील व ते अल्लाहला व हजरत मुहम्मद (स.) यांना मानीत असूनदेखील त्यांच्याशी असे युद्ध केले जसे काफिरांशी (नास्तिकांशी) केले जाते. यावरून असे कळले की जकात अदा केल्याशिवाय नमाज, रोजा व ईमानचा दावा वगैरे सर्व व्यर्थ आहेत, कोणतीही गोष्ट विश्वसनीय होऊ शकत नाही.

# सर्व पैगंबरांच्या उम्मत (अनुयायी) वर जकात अनिवार्य

पवित्र कुरआनचे वाचन करून पहा. आपणास दिसून येईल की प्राचीन काळापासून सर्व पैगंबरांच्या उम्मतला नमाज व जकातची आज्ञा अनिवार्यतेने दिली गेली आहे आणि कोणत्याही पैगंबरांच्या काळात या दोन्ही गोष्टी इस्लाममध्ये नव्हत्या असे नाही. हजरत इब्राहीम (अ.) व त्यांच्या वंशातील पैगंबरांचे वर्णन केल्यानंतर अल्लाहने फर्माविले आहे–

*"आम्ही त्यांना मानवांचे प्रमुख (नेते) बनविले. ते आमच्या आज्ञेप्रमाणे लोकांना मार्गदर्शन करीत असत. आम्ही वही (ईश्वरी संदेश) द्वारे त्यांना सत्कृत्य करण्याचे व नमाज पढण्याचे व जकात देण्याचे शिक्षण दिले आणि ते आमची उपासना करणारे होते."* - *सूरतुल अंबिया : ७३*

हजरत इस्माईल (अ.) यांच्यासंबंधी सांगितले आहे–

*"ते आपल्या लोकांना नमाज व जकातविषयी आज्ञा देत असत व ते अल्लाहला प्रिय होते."*

- *सूरह मरयम : ५५*

हजरत मूसा (अ.) यांनी आपल्या जातीसाठी प्रार्थना केली की, हे अल्लाह, आम्हाला या जगात सुद्धा मांगल्य प्रदान कर व परलोकात सुद्धा मांगल्य दे. आपल्याला माहीत आहे की याच्या उत्तरादाखल अल्लाहने काय फर्माविले? उत्तरात म्हटले गेले,–

*"मी आपल्या प्रकोपाचा हवे त्याला वेढा घालीन यद्यपि माझी कृपा प्रत्येक वस्तूवर आच्छादित झाली आहे. परंतु ही कृपा मी त्याच लोकांसाठी लिहीन जे माझे भय बाळगतील आणि जकात देतील आणि आमच्या आयातवर (ईश्वरी वचनावर) ईमान आणतील."*

- *सूरतुल आअराफ़ : १५६*

हजरत मूसा (अ.) यांच्या जातीचे लोक संकुचित मनाचे व हल्लीच्या यहूदींप्रमाणेच (ज्यू लोकांप्रमाणे) पैशासाठी जीव देणारे असल्यामुळे महान अल्लाहने इतक्या आदरणीय पैगंबराच्या प्रार्थनेला उत्तर म्हणून स्पष्टपणे फर्माविले की जर

तुमच्या उम्मतने नियमितपणे जकात अदा केली तर त्यांच्यासाठी माझा कृपेचा वायदा आहे, नाहीतर आताच स्पष्टपणे ऐकून घ्या की ते माझ्या कृपेपासून वंचित राहतील आणि माझा प्रकोप त्यांना वेढून टाकील. म्हणून हजरत मूसा (अ.) यांच्यावर सुद्धा वारंवार बनी इस्राईल (यहूदी-ज्यू) यांना या गोष्टीबद्दल धमकाविले जात राहिले. पुन्हा पुन्हा त्यांच्याकडून वचन घेतले गेले की,– *''त्यांनी अल्लाहशिवाय इतर कोणाची उपासना करू नये व नमाज आणि जकात नियमितपणे अदा करीत रहावे.'' (सूरतुल बकरह : १०).* येथपावेतो की शेवटी स्पष्ट नोटीस दिली गेली की,–

*अल्लाहने फर्माविले की,– ''हे बनी इस्राईल, मी तुमच्याबरोबर आहे, दर तुम्ही नमाज पढत व जकात देत रहाल आणि माझ्या पैगंबरवर ईमान आणत रहाल आणि जे पैगंबर येतील त्यांच्यावर ईमान (विश्वास) आणाल व जे पैगंबर येतील त्यांना सहाय्य कराल आणि अल्लाहला 'कर्जहसन' (असले कर्ज, जे परत दिले तरी चालेल व न दिले तरी चालेल) द्याल, तर मी तुमच्यात असलेल्या वाईट गोष्टी तुमच्यापासून दूर करीन.''*

*- सूरतुलमाइदह : १२*

पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्यापूर्वी पैगंबर हजरत ईसा (अ.) हे अखेरचे पैगंबर होते, तर त्यांनादेखील महान अल्लाहने नमाज व जकातची आज्ञा एकाचवेळी दिली. जसे–

*''महान अल्लाहने मला भरभराट दिली मग कोठे का मी असेना आणि मला आदेश दिला की मी नमाज अदा करावी व जकात देत रहावे की जोपर्यंत मी जिवंत राहीन.''*

*- सूरह मरयम : ३१*

यावरून असे कळले की इस्लाम धर्म प्रारंभापासूनच प्रत्येक पैगंबराच्या काळात नमाज व जकातच्या या दोन मोठ्या स्तंभावर उभा आहे आणि कधीही असे घडले नाही की अल्लाहवर ईमान ठेवणाऱ्या कोणत्याही उम्मतला या दोन्ही अनिवार्य गोष्टी माफ केल्या गेल्या असाव्यात.

# 'उम्मते मुस्लिमाह' (पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे अनुयायी) वर जकात अनिवार्य

आता पहा की पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या शरीअत (धार्मिक कायदा) मध्ये, हे दोन्ही फर्ज़ (अनिवार्य गोष्ट) कशाप्रकारे जोडीने आलेले आहेत. पवित्र कुरआन उघडल्याबरोबर सर्वप्रथम ज्या आयात (पवित्र कुरआनातील वचने) दृष्टीस पडतात त्या काय आहेत?

*"हा पवित्र कुरआन अल्लाहचा ग्रंथ आहे, यात कोणतीही शंका नाही. हा अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांना जगात जीवनाचा सरळ मार्ग दाखवितो आणि अल्लाहचे भय बाळगणारे ते लोक आहेत जे परोक्षावर विश्वास ठेवतात व नमाज अदा करतात आणि जी रोजी आम्ही त्यांना दिलेली आहे त्यातून अल्लाहच्या मार्गात खर्च करतात."- सूरतुल बकरह : १-३*

मग फर्माविले—

*"अशाच लोकांनी आपल्या पालनकर्त्याकडून मार्गदर्शन प्राप्त केलेले आहे आणि अशाच लोकांसाठी कल्याण आहे."*

म्हणजे ज्यांच्यापाशी ईमान नाही व ज्यांच्यापाशी नमाज व जकातसंबंधी नियमितपणा नाही त्यांना मार्गदर्शन नाही व त्यांच्या भाग्यात कल्याणही असू शकत नाही.

यानंतर याच सूरतुलबकरहचे पठन करीत जा. कांही पृष्ठे पालटल्यावर ही आज्ञा आढळते—

*"नियमितपणे नमाज अदा करीत जा आणि जकात द्या व रुकूअ करणाऱ्यासमवेत रुकूअ करा (म्हणजे जमाअतसह नमाज अदा करा)."*

*- सूरतुल बकरह : १४३*

यानंतर थोडे पुढे पठन करीत राहिल्यावर याच सूरतमध्ये असे म्हटलेले आढळेल,—

*"सत्कर्म केवळ याचे नाव नव्हे की पूर्व अथवा पश्चिमेकडे तुम्ही तोंड*

*केले. तर सत्कर्म त्या माणसाचे आहे की ज्याने अल्लाह व परलोक आणि देवदूत, अल्लाहचे ग्रंथ आणि पैगंबरावर ईमान राखले व अल्लाहच्या प्रेमाखातर आपल्या गरजू नातेवाईक, अनाथ, गरीब, प्रवासी व याचकासाठी संपत्ती खर्च केली आणि (कर्ज व तुरुंगवास) यातून मान सोडविण्यास मदत केली आणि नियमितपणे नमाज अदा केली व जकात दिली. सदाचारी लोक ते आहेत जे प्रतिज्ञा केल्यावर आपली प्रतिज्ञा पूर्ण करतात आणि संकट, हानि व युद्धाच्या प्रसंगी सहनशीलतेने सत्य मार्गावर दृढ राहतात. असलेच लोक खरे मुसलमान आहेत व असलेच लोक ईशभीरू व भक्त आहेत.''*

*- सूरतुल बकरह : १७७*

पुन्हा पुढे पहा, सूरतुल माइदह मध्ये काय फर्माविले आहे–

*''मुसलमानांनो! तुमचे खरे मित्र व सहाय्यक केवळ अल्लाह, पैगंबर (स.) व ईमानधारक लोक आहेत. म्हणजे, असले लोक जे नमाज पढतात व जकात अदा करतात व अल्लाहसमोर नतमस्तक होतात. म्हणून जो मनुष्य अल्लाह व पैगंबर (स.) आणि ईमानधारक लोकांना मित्र बनवितो तो अल्लाहच्या पक्षाचा मनुष्य आहे आणि अल्लाहचाच पक्ष प्रभावी होणार आहे.''* *- सूरतुलमाइदह : ५५-५६*

# ईमानधारकाची निशाणी, नमाज व जकात

या वैभवशाली आयतमध्ये एक महान कायदा सांगितला आहे. सर्वात प्रथम तर या आयतीवरून आपल्याला कळले की ईमानधारक केवळ ते लोक आहेत जे नमाज पढतात व जकात देतात. इस्लामच्या या दोन तत्त्वांकडून (अर्थात नमाज व जकात) जे लोक तोंड फिरवितात त्यांचा ईमानचा दावाच खोटा आहे. या आयतवरून असे लक्षात आले की अल्लाह आणि पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आणि ईमानधारकांचा एक पक्ष आहे आणि ईमानधारकाचे हे कर्तव्य आहे की सर्वांपासून वेगळे होऊन याच पक्षात त्याने सामील व्हावे. जो मुसलमान या पक्षाच्या बाहेरील एखाद्या माणसाला, मग तो त्याचा बाप, भाऊ, मुलगा, शेजारी, स्वदेशी अथवा कोणीही असो, जर तो मित्र बनवील आणि त्याच्याशी प्रेम व सहकार्याचे

संबंध ठेवील तर त्याने अशी आशा बाळगू नये की अल्लाहने त्याला मदत करीत रहावे. सर्वात अखेरीस या आयतीवरून असेदेखील कळले की ईमानधारकांचा दबदबा व प्रभाव केवळ त्याच स्थितीत निर्माण होईल जेव्हां ते एकाग्रतेने अल्लाह व पैगंबर (स.) आणि केवळ ईमानधारकांनाच आपला सखा, सहाय्यक, मित्र व सोबती बनवतील.

# इस्लामी बंधुत्वाचा पाया

सूरह तौबा मध्ये महान अल्लाहने मुसलमानांना नास्तिक व अनेकेश्वरवाद्यांशी युद्ध करण्याची आज्ञा दिली आहे आणि अखंडपणे अनेक रूकूअपर्यंत युद्धासंबंधीच आदेश दिलेले आहेत. या संबंधाने फर्मावि‌ले आहे–

***"मग जर त्यांनी नास्तिकता व अनेकेश्वरवादाचा त्याग केला व त्याबद्दल पश्चात्ताप केला व जर ईमान आणले आणि नमाज व जकात अदा करू लागले तर ते तुमचे धर्म-बंधु होत."*** ***- सूरह तौबा : ११***

याचा अर्थ असा की केवळ नास्तिकता व अनेकेश्वरवादाचा त्याग करणे, पश्चात्ताप करणे व ईमान आणणे पुरेसे नाही. खरोखर त्यांनी नास्तिकता व अनेकेश्वरवादाचा त्याग केला व पश्चात्ताप व्यक्त केला आणि खरोखर त्यांनी ईमान आणले आहे या गोष्टीचा पुरावा केवळ अशाच प्रकारे मिळू शकतो की त्यांनी नमाज अदा करण्यात नियमितपणा दाखवावा व जकात देत रहावे. जर त्यांनी या कृति करून आपल्या ईमानचा पुरावा दिला तर ते तुमचे धर्म-बंधु आहेत, नाहीतर त्यांना बंधु समजू नका व त्यांच्याशी युद्ध करणे बंद करू नका.

यापुढे याच सूरहमध्ये फर्मावि‌ले आहे–

***"ईमानधारक पुरुष व ईमानधारक स्त्रिया एकमेकाचे मित्र व सहाय्यक होत आणि या ईमानधारक पुरुष व स्त्रियांची वैशिष्ट्ये अशी आहेत की ते सदाचार करण्याची आज्ञा देतात, दुराचारापासून रोखतात, नमाज नियमितपणे अदा करतात व जकात देतात आणि अल्लाह व पैगंबर (स.) यांच्या आज्ञा पाळतात. अशाच लोकांवर अल्लाह कृपा करील."***

***- सूरह तौबा : ७१***

लक्षात ठेवा की कोणताही मनुष्य मुसलमानांचा तोपर्यंत धर्म-बंधु बनूच शकत नाही जोपर्यंत तो ईमानचा स्वीकार करून प्रत्यक्षपणे नमाज व जकात नियमितपणे अदा करीत नाही. ईमान, नमाज व जकात या तिन्ही गोष्टींमुळे ईमानधारकांची जमाअत बनते. जे लोक या तिन्ही गोष्टींचे नियमितपणे पालन करतात त्यांचा या पवित्र जमाअतमध्ये समावेश होतो आणि त्यांच्याच दरम्यान मैत्री, प्रेम, सख्य व सहकार्याचे संबंध असतात आणि जे यांचे पालन करीत नाहीत, ते या जमाअतच्या बाहेर आहेत, मग ते केवळ नामधारी मुसलमान कां असेनात. त्यांच्याशी मैत्री, प्रेम व मित्रत्वाचे संबंध ठेवण्याचा अर्थ असा आहे की तुम्ही अल्लाहच्या कायद्याचा भंग केला आणि अल्लाहच्या पक्षाला विस्कळीत केले. मग अशा स्थितीत तुम्ही जगात प्रभावशाली बनून राहण्याची स्वप्ने कशी पाहू शकता?

आणखी पुढे चला. सूरह हज मध्ये म्हटले आहे की—

## अल्लाहच्या सहाय्याबद्दल अटी

*''अल्लाह त्यांना अवश्य सहाय्य करील जे त्याला मदत करतील आणि अल्लाह प्रचंड शक्तिमान व सर्वावर प्रभावी आहे. हे लोक असे आहेत की जर आम्ही त्यांना राज्य प्रदान केले तर हे नमाज कायम करतील (अदा करतील), जकात देतील, सदाचाराची आज्ञा देतील आणि दुराचारापासून रोखतील आणि सर्व गोष्टींचे फळ अल्लाहच्या हाती आहे.''*

*- सूरतुलहज्ज : ४०-४१*

या आयतीत मुसलमानांना सुद्धा तीच नोटीस देण्यात आलेली आहे जी बनी इस्राईलना दिली गेली होती. त्यांना स्पष्टपणे सांगण्यात आले होते की मी तोपर्यंतच तुमच्याबरोबर आहे जोपर्यंत तुम्ही नमाज पढत व जकात देत रहाल आणि माझ्या पैगंबरांच्या कार्यात त्यांना सहकार्य करीत रहाल, म्हणजे माझा कायदा जगात प्रचलित करण्याचा प्रयत्न करीत रहाल. जेव्हां तुम्ही हे कार्य सोडून द्याल तेव्हां मी आपल्या मदतीचा हात खेचून घेईन. ठीक हीच गोष्ट अल्लाहने मुसलमानांना सुद्धा सांगितली आहे त्यांना स्पष्ट सांगितले आहे की जर जगात शक्ती प्राप्त करून तुम्ही नमाज चालू ठेवाल व जकात द्याल आणि सदाचाराचा प्रसार कराल व दुराचाराचा विनाश कराल तर मी तुम्हाला सहाय्यक ठरेन आणि

ज्याचा पाठीराखा मी असेन त्याच्यावर कोण दबाव आणू शकेल? परंतु जर तुम्ही जकातकडून तोंड फिरविले आणि पृथ्वीवर राज्य प्राप्त करून सदाचाराऐवजी दुराचाराचा फैलाव कराल आणि दुराचाराऐवजी सदाचाराचा विनाश करू लागला आणि माझ्या कलम्याऐवजी आपला कलमा (ब्रीद वाक्य) उंचावू लागला, आणि खंडणी वसूल करून स्वतःसाठी जगात स्वर्गाची निर्मिती करण्यालाच ऐहिक वारशाचे उद्दिष्ट समजले तर लक्षात ठेवा की माझे सहाय्य तुम्हाला असणार नाही. मग शैतानच तुमचा सहाय्यक राहील.

## मुसलमानांना धमकी

किती धडा घेण्याजोगी गोष्ट आहे! जी धमकी बनी इस्राईलना दिली गेली होती ती पोकळ व तोंडी धमकी आहे असे ते समजले आणि त्याच्याविरूद्ध कृति करून त्याची अशी कटु फळे त्यांनी चाखली की आजतागायत ते पृथ्वीतलावर वणवण हिंडत आहेत, सर्वत्र ते हाकलले जात आहेत आणि कोठेही त्यांना आश्रय मिळत नाही. कोट्यावधी रूपयांचे त्यांचे खाते आहेत. जगातील सर्वात श्रीमंत ती जात आहे, परंतु त्या संपत्तीचा त्यांना कांहीही फायदा नाही. नमाजऐवजी दुराचार व जकातऐवजी व्याजखोरीच्या शापित पद्धतीचा अवलंब करून त्यांनी स्वतःवरदेखील अल्लाहच्या शापाला लादून घेतले आणि आता या शापाला ते प्लेगाच्या उंदराप्रमाणे वाहून नेऊन जगभर पसरवीत फिरत आहेत. पुन्हा हीच धमकी मुसलमानांना दिली गेली आहे आणि मुसलमानांनी त्याची कांहीही पर्वा नकरता ते नमाज़ व जकातकडून निश्चिंत राहिले आणि अल्लाहने प्रदान केलेल्या शक्तीचा सदाचाराचा प्रसार करण्यासाठी व दुराचाराचा विनाश करण्यासाठी प्रयोग करावयाचे त्यांनी सोडून दिले. त्याचा परिणाम पहा की राज्याच्या सिंहासनावरून त्यांना खेचून फेकून दिले गेले, जगभरात ते अत्याचाऱ्यांच्या अत्याचाराला बळी पडत आहेत आणि पृथ्वीतलावर सर्वत्र ते निर्बळ, दबलेले व पीडित आहेत. नमाज व जकातचा त्याग करण्याचा दुष्परिणाम आपण पाहिला. आता त्यांच्यापैकीच एक गट असा उत्पन्न झाला आहे जो मुसलमानांना निर्लज्जपणा, अश्लीलपणा व दुराचारांत गुरफटून टाकू इच्छितो, आणि त्यांना सांगत आहे की तुमच्या गरिबीवर उपाय असा आहे की बँका व विमा कंपन्यांची स्थापना करा. व्याज खाणे सुरू करा. अल्लाहची शपथ!

जर त्यांनी असे केले तर त्यांना कमीपणा व अपमानाचे तोंड पहावे लागेल. अगदी तसेच जसे यहूदी लोक त्यात गुरफटलेले आहेत आणि हे मुसलमान सुद्धा तशाच शापात अडकतील ज्यात बनी इस्राईल घेरले गेले आहेत.

## जकात न देणाऱ्यांचा शेवट

इस्लामी बंधुनो! आगामी प्रवचनात मी सांगेन की जकात म्हणजे काय? किती महान शक्ती अल्लाहने त्यात समाविष्ट केलेली आहे! आज अल्लाहच्या ज्या कृपाप्रसादाला मुसलमान लोक साधारण गोष्ट समजत आहेत वास्तविकतः त्यात किती भरभराट लपलेली आहे! आजच्या प्रवचनात माझा उद्देश आपल्याला केवळ असे सांगावयाचा होता की इस्लाममध्ये नमाज व जकातचे काय स्थान आहे. अनेक मुसलमान असे समजतात आणि त्यांचे मौलवी (धर्मपंडित) त्यांना रात्रंदिवस असा भरंवसा देतात की नमाज न पढता व जकात अदा न करतादेखील ते मुसलमान राहतात. परंतु पवित्र कुरआन याचे स्पष्ट शब्दांत खंडन करतो. पवित्र कुरआनच्या दृष्टीने जर मनुष्य कल्मा-ए-तय्यबा (पवित्र वचन) मान्य करीत असल्याबद्दल पुराव्यादाखल नमाज अदा करण्याचा व जकात देण्याचा अवलंब करीत नसेल तर ही त्याची मान्यता निरर्थक आहे. म्हणूनच हजरत अबू बक्र (रजि.) यांनी जकातचा इन्कार करणाऱ्यांना काफिर (नास्तिक, अनेकेश्वरवादी) समजून त्यांच्याविरूद्ध तलवार उचलली होती, जसे की मी आपणास आताच सांगितले आहे. आदरणीय सहाबा (रजि., पैगंबरांचे सोबती) यांना प्रारंभी अशी शंका होती की तो मुसलमान जो अल्लाह व पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना मानतो व नमाजसुद्धा अदा करतो तो त्या लोकांच्या गटात सामील केला जाऊ शकतो की नाही की ज्यांच्याविरूद्ध तलवार उचलण्याची आज्ञा आहे. परंतु जेव्हां हजरत अबू बक्र (रजि.), ज्यांना अल्लाहने पैगंबरीच्या स्थानाजवळचा दर्जा दिला होता, आपल्या म्हणण्यानुसार अडले आणि त्यांनी आग्रहपूर्वक सांगितले की अल्लाहची शपथ जर या लोकांनी, त्या जकातपैकी की जी ते पैगंबर (स.) यांच्या काळात देत असत, उंटाला बांधण्याची दोरी सुद्धा न देता पाठीमागे रोखून ठेवली तर मी त्यांच्याविरूद्ध तलवार उचलीन. तेव्हां अखेरीस अल्लाहने सत्य सर्व सहाबांच्या हृदयात उघड केले आणि सर्वांनी ही गोष्ट मान्य केली की जकात देण्यास नकार देणारांशी धर्मयुद्ध (जिहाद)

केले जावे. पवित्र कुरआन तर स्पष्टपणे सांगतो की जकात न देणे त्या अनेकेश्वरवाद्यांचे कर्म आहे जे आखिरतचा (अंतिम दिनाचा) इन्कार करतात.

*"विनाश आहे त्या अनेकेश्वरवाद्यांसाठी जे जकात देत नाहीत आणि अंतिम दिनाचा इन्कार करतात."* - *सूरह हाऽमीऽम सजदह : ६-७*

# जकातची वास्तविकता

इस्लामी बंधुनो! गत प्रवचनात मी आपल्याला सांगितले आहे की नमाजनंतर इस्लामचे सर्वात महत्वाचे स्तंभ जकात आहे. ही इतकी महान गोष्ट आहे की ज्याप्रमाणे नमाजचा इन्कार करणाऱ्यांना काफिर ठरविले गेले त्याचप्रमाणे जकात अदा करण्यास नकार देणाऱ्यांना सुद्धा न केवळ काफिर ठरविले गेले तर त्यांच्याशी सहाबा (रजि.) यांनी एकमताने जिहाद (धर्मयुद्ध) केले.

आता मी आजच्या प्रवचनात जकातची वास्तविकता स्पष्ट करीन जेणेकरून आपल्याला कळावे की ही जकात खरोखर आहे तरी काय आणि इस्लाममध्ये याला इतके महत्व का दिले गेले आहे?

## अल्लाहशी जवळीक कशी साध्य होते?

### बुद्धि व विवेकाची परीक्षा

आपल्यापैकी कांही लोक बिचारे इतके साधे व सरळ आहेत की जे प्रत्येकाशी पात्र-अपात्र न पाहता मैत्री करतात, आणि कधीही मैत्री करताना माणसाची पारख करीत नाहीत की खरोखर तो मैत्री करण्यास योग्य आहे किंवा नाही. अशा लोकांची मैत्रीच बहुत करून फसवणूकच होते, आणि त्यांना नंतर निराशेचे तोंड पहावे लागते. परंतु जे बुद्धिमान लोक आहेत ते ज्या लोकांना भेटतात त्यांची चांगली पारख करतात व त्यांची सर्वप्रकारे चौकशी व विचारपूस करतात आणि मग त्यांच्यापैकी जो खरा, निःस्वार्थी व प्रामाणिक मनुष्य आढळतो केवळ त्यालाच ते मित्र बनवितात आणि अपात्र लोकांचा त्याग करतात.

महान अल्लाह सर्वात मोठा विवेकशील व बुद्धिमान आहे. त्याच्याकडून अशी अपेक्षा कशी केली जाऊ शकते की त्याने प्रत्येक पात्र व अपात्राला मित्र बनवावे, आपल्या पक्षात सामील करून घ्यावे, आणि आपल्या दरबारात मान मरातब व निकटवर्ती स्थान द्यावे. जर मानवांच्या विवेक व बुद्धिमत्तेची अशी निकड आहे की तो तपासणी व पारख केल्याशिवाय कोणालाही मित्र बनवीत नाही तर अल्लाह, जो सर्व शहाणपणा व विवेकाचा मूळ स्रोत आहे त्याने प्रत्येकाची तपासणी

व पारख केल्याशिवाय आपला मित्र बनविणे व मित्रत्वाचे उच्च पद बहाल करणे शक्य नाही. हे कोट्यावधी लोक जे पृथ्वीवर सर्वत्र पसरलेले आहेत, ज्यात सर्व प्रकारचे लोक आढळतात, चांगले व वाईट, सर्वचजण या योग्य असत नाहीत की त्यांना अल्लाहच्या त्या पक्षात, अल्लाहच्या त्या संत समाजामध्ये सामील केले जावे ज्याला महान अल्लाह जगात प्रतिनिधित्वाचे पद व परलोकात निकटवर्ती स्थान प्रदान करू इच्छितो. महान अल्लाहने अत्युच्च विवेकाने कांही परीक्षा, कांही कसोट्या, कांही प्रमाण तपासण्यासाठी व परीक्षणासाठी निश्चित केलेले आहेत की माणसापैकी जो कोणी या निकषावर पुरा उतरेल त्याने तर अल्लाहच्या पक्षात यावे आणि जो यावर पुरा उतरत नसेल त्याने आपोआपच या पक्षाबाहेर जाऊन वेगळे व्हावे आणि त्याने स्वतःदेखील समजून घ्यावे की मी या पक्षात सामील होण्यास योग्य नाही.

हे प्रमाण कोणते आहेत? ज्या अर्थी महान अल्लाह विवेकी व बुद्धिमान आहे त्याअर्थी सर्वप्रथम तो माणसाच्या विवेक व बुद्धिमत्तेचीच परीक्षा घेतो. तो पाहतो की याच्यात समज-उमज आहे की नाही? निव्वळ मूर्ख तर नाही ना? त्याला कारण असे की अडाणी व मूर्ख कदापि बुद्धिमान व विवेकशीलचा मित्र बनू शकत नाही. जो मनुष्य अल्लाहच्या निशाण्या पाहून ओळखू शकेल की तोच माझा स्वामी व सृजनकर्ता आहे, त्याच्याशिवाय कोणीही उपास्य, कोणीही पालनकर्ता, कोणीही प्रार्थना ऐकणारा व सहाय्य करणारा नाही, जो मनुष्य अल्लाहची वाणी ऐकून ओळखेल की ही माझ्या स्वामीची वाणी आहे, अन्य कोणाची असणे शक्य नाही; आणि जो मनुष्य खऱ्या पैगंबर व खोट्या दावेदारांचे जीवन, त्यांचे चारित्र्य, त्यांचे व्यवहार, त्यांची शिकवण, त्यांची कार्ये यामधील फरक समजून घेईल व ओळखेल की नबुव्वतचा (पैगंबरी) दावा करणाऱ्यांपैकी अमुक पवित्र व्यक्तित्व तर खरोखरच अल्लाहकडून मार्गदर्शन करण्यासाठी आलेले आहे, आणि अमुक दुष्ट धोकेबाज आहे, तो बुद्धिमत्तेच्या कसोटीत उत्तीर्ण होईल. महान अल्लाह असल्या मनुष्याला अन्य लोकांच्या गर्दीतून वेगळा करून आपल्या पक्षाच्या निवडक उमेदवारात सामील करून घेतो, बाकीचे ते लोक जे अगोदरच परीक्षेत नापास होतात त्यांना सोडून दिले जाते की त्यांनी हवे तिकडे भटकत फिरावे.

## नैतिक सामर्थ्याची कसोटी

या पहिल्या कसोटीत जे उमेदवार उत्तीर्ण होतात त्यांना पुन्हा दुसऱ्या परीक्षेत सामील व्हावे लागते. या दुसऱ्या परीक्षेत माणसाच्या बुद्धिमत्तेबरोबरच त्याच्या नैतिक सामर्थ्याचीदेखील चाचणी घेतली जाते, हे पाहिले जाते की या माणसात सत्य व सत्कर्मांचे ज्ञान प्राप्त करून ते कबूल करण्याचे व त्यानुसार कर्म करण्याचे आणि असत्य व अनाचाराची जाणीव झाल्यावर त्यांचा त्याग करण्याचे सामर्थ्य आहे किंवा नाही? हा आपल्या मनाच्या इच्छांचा, बापजाद्यांच्या अनुकरणाचा, वांशिक प्रथांचा, जगातील सामान्य विचार व पद्धतींचा गुलाम आहे काय? त्याच्यात हे दौर्बल्य तर नाही ना की त्याला एखादी गोष्ट अल्लाहच्या आदेशाविरूद्ध असल्याचे आढळते आणि तो जाणतो की ती वाईट आहे, पण तरी सुद्धा तो तिच्यातच गुरफटून राहतो? दुसरी गोष्ट तो जाणतो की ती अल्लाहच्या दृष्टीने सत्य व आवडीची आहे तरी सुद्धा तिचा स्वीकार करीत नाही? या परीक्षेत जे लोक नापास होतात, त्यांना सुद्धा महान अल्लाह आपल्या पक्षात घेण्यास नकार देतो आणि केवळ त्या लोकांची निवड करतो ज्यांची व्याख्या अशी आहे—

*"अल्लाहच्या आदेशाविरूद्ध जो मार्ग आणि जी पद्धत का असेना, तिचा त्यांनी धैर्याने त्याग करावा, कोणत्याही गोष्टीची पर्वा करू नये आणि केवळ अल्लाहने दाखविलेल्या मार्गावर चालण्यासाठी तत्पर व्हावे, मग त्यांच्यावर कुणी खुष होवो की नाखुष."* - *सूरतुलबकरह : २५६*

## ताबेदारी व आज्ञापालनाची पारख

या परीक्षेत जे लोक यशस्वी होतात त्यांना पुन्हा तिसऱ्यांदा परीक्षा द्यावी लागते. या वर्गात ताबेदारी व आज्ञापालनाची परीक्षा असते. यात आज्ञा दिली जाते की जेव्हां आमच्याकडून ड्युटी (नोकरी) साठी पुकारले जाईल तेव्हां आपल्या झोपेचा त्याग करा आणि हजर व्हा. आपल्या कामकाजाचा खोळंबा करा आणि या. आपल्या आवडींचा, आपल्या लाभांचा, आपले षोक व मनोरंजनाचा त्याग करा आणि येऊन कर्तव्य पुरे करा. उन्हाळा असो, हिवाळा असो, कांहीही असो, कोणत्याही परिस्थितीत जेव्हां कर्तव्यासाठी हाक दिली जाईल प्रत्येक अडचणीला सामोरे जा आणि धावत या. मग जेव्हां आम्ही आज्ञा देऊ की सकाळपासून

संध्याकाळपर्यंत उपाशी व तहानलेले रहा आणि आपल्या मनातील इच्छांना आळा घाला, तेव्हां या आज्ञेची पूर्णपणे अम्मलबजावणी झाली पाहिजे, मग भूक व तहानेचा कसलाही त्रास का होईना आणि कितीही चविष्ट भोजन व रूचकर सरबतांचे ढीग का तुमच्या समोर असेनात. जे लोक या परीक्षेत कच्चे पडतात त्यांना सुद्धा सागण्यात येते की तुम्ही आमच्या कामाचे नाही. निवड तर केवळ त्या लोकांची होते जे या तिसऱ्या परीक्षेत पक्के सिद्ध होतात. त्याला कारण असे की केवळ त्यांच्याकडूनच ही अपेक्षा केली जाऊ शकते की अल्लाहकडून जे कायदे त्यांच्यासाठी बनविले जातील आणि जे आदेश त्यांना दिले जातील त्यांचे पालन ते गुप्तपणे व प्रकटपणे, फायदे व नुकसान, सुख व त्रास अशा प्रत्येक स्थितीत करू शकतील.

## आर्थिक त्यागाची परीक्षा

यानंतर चौथी संपत्तीच्या त्यागाची घेण्यात येते. तिसऱ्या परीक्षेतील यशस्वी उमेदवार अद्याप यायोग्य झाले नाहीत की अल्लाहच्या सेवेत त्यांना रीतसर घेण्यात यावे. आता असे पहावयाचे आहे की ते एखादे वेळी संकुचित हृदयाचे, धैर्यहीन, भ्याड व संकुचित बुद्धीचे तर नाहीत ना? त्या लोकांपैकी तर नाहीत ना की जे प्रेम व मैत्रीच्या गोष्टी तर लांबलचक करतात, परंतु आपल्या प्रियजन व मित्रासाठी जेव्हां गाठ खोलून कांही खर्च करण्याची वेळ येते तेव्हां म्हणतात की जर पैशाची मागणी असेल तर माफ करा! त्यांची स्थिती त्या माणसाप्रमाणे तर नाही ना की जो जिभेने तर माताजी, माताजी म्हणून जयघोष करतो आणि माताजीसाठी सर्वांशी भांडण सुद्धा करतो. परंतु जेव्हां त्याच माताजीने त्याच्या धान्याच्या पाटीत अथवा त्याच्या भाजीच्या ढिगाऱ्यात तोंड घातले तर काठी घेऊन तिच्या पाठीमागे लागतो आणि मारून मारून तिचे कातडे सोलतो? अशा स्वार्थी, धनलोभी, संकुचित मनाच्या माणसाला तर सामान्य दर्जाचा बुद्धिमान मनुष्यदेखील मित्र बनवीत नाही आणि एक उदार हृदयी मनुष्य अशा प्रकारच्या नीच माणसाला आपल्यापाशी जागा देणे सुद्धा पसंत करीत नाही. मग बरे तो महान व श्रेष्ठतम अल्लाह, जो आपला खजिना प्रत्येक वेळी आपल्या असीम व असंख्य सृष्टीवर निस्सीम व असंख्य प्रकारे उधळीत आहे, अशा माणसाला आपल्या मैत्रीयोग्य कसे समजू शकेल, जो

अल्लाहने दिलेली संपत्ती अल्लाहच्या मार्गात खर्च करण्यास टाळाटाळ करतो आणि तो अल्लाह, ज्याची बुद्धिमत्ता व विवेक सर्वश्रेष्ठ आहे, कसे आपल्या पक्षात त्या माणसाला सामील करून घेईल ज्याची मैत्री व प्रेम केवळ बोलाची कढी आणि बोलाचा भात आहे, आणि ज्यावर कदापि विश्वास केला जाऊ शकत नाही? म्हणून जे लोक या चौथ्या परीक्षेत नापास होतात त्यांना सुद्धा स्पष्ट उत्तर दिले जाते की, जा, तुमच्यासाठी अल्लाहच्या पक्षात स्थान नाही, तुम्ही सुद्धा निकामी आहात आणि तुम्ही त्या वैभवशाली सेवेचा भार उचलण्यास योग्य नाही जो अल्लाहच्या प्रतिनिधीच्या सुपुर्द केला जातो. या पक्षात तर केवळ ते लोक सामील केले जाऊ शकतात जे अल्लाहच्या प्रेमाखातर प्राण, संपत्ती, संतती, कुटुंब, देश वगैरे प्रत्येक गोष्टीच्या मोह आणि प्रेमाचा त्याग करतात.

*"तोपर्यंत तुम्ही सदाचाराच्या त्या स्थानापर्यंत पोहचू शकत नाही जोपर्यंत तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या वस्तु समर्पित करीत नाही ज्या तुम्हाला प्रिय आहेत."* *- सूरह आले इमरान : ९*

## अल्लाहच्या पक्षासाठी (संत समुदायासाठी) आवश्यक गुण

### १. संकुचित हृदयाचा असू नये.

या पक्षात संकुचित हृदयाच्या लोकांसाठी स्थान नाही. यात तर केवळ तेच लोक प्रवेश करू शकतात ज्यांची हृदये विशाल आहेत.

*"जे लोक मनाच्या संकुचितपणापासून वाचले त्यांचेच कल्याण होणार आहे."* *- सूरतुलहश्र : ९*

### २. उदार मनाचे असावे

यात तर अशा उदार मनाच्या लोकांची गरज आहे की जर एखाद्या माणसाने त्यांच्याशी वैरदेखील केले, त्यांना हानि व दुःख सुद्धा पोहचविले, त्यांच्या हृदयाचे तुकडे-तुकडे केले, तरी सुद्धा अल्लाहसाठी ते त्याच्या पोटाला भाकरी व अंगाला वस्त्र देण्यास नकार देणार नाहीत आणि त्याच्या संकटसमयी त्याला मदत

करण्यास मागे-पुढे पाहणार नाहीत.

*"तुमच्यापैकी जे सुखवस्तु व धन-धान्य संपन्न आहेत, त्यांनी आपल्या प्रियजन व दीन दुबळे लोक आणि अल्लाहच्या मार्गात देश-त्याग करणाऱ्या लोकांना मदत करण्यापासून मागे हात ओढू नये. उलट त्यांनी त्यांना क्षमा करावी, काय तुम्हाला वाटत नाही की अल्लाहने तुम्हाला माफ करावे? वास्तविकतः अल्लाह मोठा क्षमाशील आणि दया करणारा आहे."*
*- सूरतुन्नूर : २२*

(ही आयत त्या प्रसंगी उतरली होती जेव्हां हजरत अबू बकर (रजि.) यांच्या एका आप्तेष्टाने त्यांची सुकन्या हजरत आयेशा (रजि.) यांच्यावर आरोप करण्यात भाग घेतला होता आणि हजरत अबू बकर (रजि.) यांनी या त्याच्या अनुचित कृतीवर नाराज होऊन त्याला आर्थिक सहाय्य देणे बंद केले होते. जेव्हां ही आयत उतरली तेव्हां हजरत अबू बकर (रजि.) यांचा थरकाप झाला आणि त्यांनी सांगितले की मी आपल्या अल्लाहची क्षमा मागतो आणि त्या माणसाला आर्थिक सहाय्य पूर्ववत केले की ज्याने त्याना इतकी भयंकर आत्मिक इजा पोहचविली होती.)

## ३. उदार व धैर्यवान असावा

यात अशा उदार व धैर्यवान लोकांची आवश्यकता आहे जे:–

*"केवळ अल्लाहच्या प्रेमाखातर गरीब, अनाथ व कैद्यांना भोजन देतात आणि म्हणतात की आम्ही केवळ अल्लाहसाठी तुम्हाला जेवू घालीत आहोत, तुमच्याकडून कसलाही मोबदला अथवा आभार प्रदर्शनाची अपेक्षा नाही."*
*- सूरतुद्दहर : ८-९*

## ४. शुद्ध-मन असावे

यात अशा शुद्ध मनाच्या लोकांची गरज आहे जे अल्लाहने दिलेल्या संपत्तीतून अल्लाहच्या मार्गात उत्तमोत्तम माल निवडून देतात.

*"हे ईमानधारकांनो! तुम्ही जी संपत्ती अर्जित केली आहे आणि जी रोजी तुमच्यासाठी आम्ही जमिनीतून काढली आहे त्यापैकी चांगला माल*

*अल्लाहच्या मार्गात खर्च करा. वाईटात वाईट निवडून देऊ नका."*

*- सूरतुलबकरह : २६७*

## ५. दारिद्र्य व गरिबीत सुद्धा खर्च करा.

यात त्या मोठ्या धैर्यवान लोकांची गरज आहे जे दारिद्र्य व गरिबीच्या स्थितीत सुद्धा स्वतः अर्धपोटी राहून अल्लाहच्या धर्माची सेवा व अल्लाहच्या गुलामांना मदत करण्यासाठी पैसे खर्च करण्यास मागे-पुढे करीत नाहीत.

*"आपल्या पालनकर्त्याची क्षमा व त्या स्वर्गाकडे धाव घ्या ज्याचा विस्तार पृथ्वी व आकाशा इतका आहे आणि जे तयार करून ठेवले गेले आहे त्या भक्तासाठी जे सुस्थिती व दारिद्र्य, या दोन्ही स्थितीत अल्लाहसाठी खर्च करतात."* *- सूरह आले इमरान : १३३*

## ६. दातृत्व-वृत्ती असावी.

यात त्या ईमानधारकांची आवश्यकता आहे जे मनःपूर्वक या गोष्टीवर विश्वास ठेवतात की जे कांही अल्लाहच्या मार्गात खर्च केले जाईल ते व्यर्थ जाणार नाही, तर महान अल्लाह इहलोकात व परलोकात त्याचा उत्तम मोबदला प्रदान करील, म्हणून ते केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी खर्च करतात. या गोष्टीची कांही पर्वा करीत नाहीत की लोकांना त्यांच्या दातृत्व व दानशूरतेबद्दल कळले किंवा नाही, आणि कुणी त्यांनी दिलेल्या दानाबद्दल कृतज्ञता व्यक्त केली किंवा नाही?

*"तुम्ही जे कांही अल्लाहच्या मार्गात खर्च कराल ते तुमच्यासाठीच कल्याणकारी आहे त्याला कारण असे की तुम्ही आपल्या या खर्चाद्वारे अल्लाहशिवाय दुसऱ्या कोणाच्या प्रसन्नतेची अपेक्षा करीत नाही. अशा प्रकारे जे कांही तुम्ही कल्याणकारी कार्यात खर्च कराल त्याचा पुरेपूर लाभ तुम्हाला मिळेल आणि तुमच्यावर कणमात्र जुलुम होणार नाही."*

*- सूरतुलबकरह : २७२*

## ७. कोणत्याही परिस्थितीत अल्लाहचे स्मरण करावे.

या पक्षासाठी त्या शूरांची गरज आहे ज्यांना श्रीमंती व सुस्थितीत सुद्धा

अल्लाहचे विस्मरण होत नाही ज्यांना महालात बसून व वैभवात राहून सुद्धा अल्लाहची आठवण राहते

*"हे ईमानधारकांनो! संपत्ती व संततीच्या प्रेमाने तुम्हाला अल्लाहच्या स्मरणापासून गाफिल करू नये. जो असे करील तो स्वतः तोट्यात राहणारा आहे."* *- सूरतुल मुनाफिकून : ९*

अल्लाहच्या पक्षात सामील होण्यासाठी हे गुण आवश्यक आहेत. त्यांच्याशिवाय कोणताही मनुष्य अल्लाहच्या मित्र-मंडळीत सामील होऊ शकत नाही. वास्तविकतः ही माणसाच्या नैतिकतेचीच नव्हे तर त्याच्या ईमानची सुद्धा कठोर व कठीण परीक्षा आहे. जो मनुष्य अल्लाहच्या मार्गात खर्च करण्यास मागे-पुढे पाहतो, त्या खर्चाला खिशाला चाट व दंड समजतो, बहाणे व कारणे शोधून त्यापासून वाचण्याचे मार्ग धुंडाळतो आणि जर खर्च केलाच तर झालेल्या मनःस्तापाचा लोकांवर उपकाराची जाणीव देऊन उट्टा काढण्याचा प्रयत्न करतो. किंवा अशी अपेक्षा करतो की त्याच्या दातृत्वाची जाहिरात व्हावी. खरे पाहता त्याचा अल्लाह व परलोकावर विश्वासच नसतो. त्याला असे वाटते की अल्लाहच्या मार्गात जे काही खर्च केले ते व्यर्थ झाले. त्याला आपले ऐश्वर्य, आपली विश्रांति, आपल्या रुचि, आपले लाभ आणि आपली कीर्ति अल्लाह व त्याच्या प्रसन्नतेपेक्षा अधिक प्रिय असते. तो समजतो की जे कांही आहे ते याच जगातील जीवन आहे. जर पैसे खर्च केले तर याच जगात त्याचे नाव निघावे व प्रसिद्धी व्हावी जेणेकरून या पैशांची किंमत येथेच वसूल व्हावी. नाहीतर जर धन ही गेले आणि कोणालाच इतकेही कळले नाही की अमुक महाशयांनी अमुक सत्कर्मासाठी इतके धन खर्च केले आहे तर जणु सर्व मातीत मिसळते. पवित्र कुरआनमध्ये स्पष्टपणे फर्माविले आहे की, अशा प्रकारचा मनुष्य अल्लाहच्या उपयोगाचा नाही. जर तो ईमानचा (अल्लाहवरील विश्वासाचा) दावा करीत असेल तर तो ढोंगी आहे. त्यासंबंधी खालील आयती पहा–

## ८. उपकाराची जाणीव देऊ नका.

*"हे ईमानधारकांनो! आपले दान उपकाराची जाणीव देऊन व व्यथा देऊन त्या माणसाप्रमाणे वाया घालवू नका जो केवळ लोकांना*

*दाखविण्यासाठी व नाव व्हावे म्हणून खर्च करतो आणि अल्लाह व परलोकावर विश्वास ठेवीत नाही."* - सूरतुलबकरह : २६४

## ९. संपत्ति-संचय करू नये.

*"जे लोक सोने व चांदी जमा करून करून ठेवतात आणि ते अल्लाहच्या मार्गात खर्च करीत नाहीत त्यांना कठोर शिक्षेचा शुभ संदेश द्या."* - सूरतुत्तौबह : ३४

## १०. अल्लाहच्या मार्गात सवलत मागू नका.

*"हे पैगंबर (स.)! जे लोक अल्लाह व अंतिम दिनावर विश्वास ठेवतात ते तर कदापि अशी अपेक्षा करणार नाहीत की त्यांना आपल्या प्राण व संपत्तीसह जिहादमध्ये (धर्मयुद्धात) सामील न होण्याची सवलत दिली जावी. अल्लाह आपल्या ईशभीरू गुलामांना चांगल्या प्रकारे ओळखतो. सवलत तर केवळ ते लोक मागतात जे अल्लाह व परलोकावर विश्वास ठेवत नाही, ज्यांच्या मनात शंका आहे आणि जे आपल्या शंकेतच संत्रस्त गुरफटलेले आहेत."* - सूरतुत्तौबह : ४४-४५

## ११. अल्लाहच्या मार्गात प्रसन्नचित्ताने आज्ञापालन करा.

*"अल्लाहच्या मार्गात त्यांनी खर्च केलेले धन केवळ अशासाठी स्वीकार केले जाऊ शकत नाही की मुळात ते अल्लाह व त्याच्या पैगंबरावर विश्वास ठेवीत नाहीत. नमाजला येतील तर खिन्न मनाने आणि धन खर्च करतील तर तिरस्काराने."* - सूरतुत्तौबह : ५४

*"ढोंगी (धर्मद्रोही) पुरुष व स्त्रिया एकाच माळेचे मणि आहेत. ते दुराचार करण्याची आज्ञा देतात आणि पुण्यकार्याला मनाई करतात व अल्लाहच्या मार्गात खर्च करण्यापासून हात आखडतात. ते अल्लाहला विसरून गेले आणि अल्लाह त्यांना विसरून गेला, निश्चितपणे हे ढोंगी दुराचारी आहेत."* - सूरतुत्तौबह : ६७

## १२. अल्लाहच्या मार्गातील खर्चाला भुर्दंड समजू नये.

*"या अअराब (ढोंगी) पैकी कांही ते लोक सुद्धा आहेत जे अल्लाहच्या मार्गात जरी खर्च करतात तरी जबरदस्तीचा भुर्दंड म्हणून."*

*-सूरतुतौबह : ९८*

## १३. कंजुषपणा करू नका.

*"लक्षात ठेवा, तुम्ही लोक असे आहात की तुम्हाला जर अल्लाहच्या मार्गात खर्च करावयास सांगितले तर तुमच्यापैकी अनेक लोक कंजुषपणा करतात आणि जो कोणी या कामात कंजुषपणा करील तो स्वतःसाठीच कंजुषपणा करील. अल्लाह तर श्रीमंत आहे, तुम्हालाच त्याची गरज आहे. जर तुम्ही अल्लाहच्या कार्यात खर्च करण्यापासून तोंड फिरविले तर तो तुमच्या जागी दुसऱ्या जातीला आणील आणि ते तुमच्यासारखे असणार नाहीत."* *- सूरह मुहम्मद : ३८*

इस्लामी बंधुनो, अशी आहे जकातची वास्तविकता जी आपल्या धर्माचा एक स्तंभ आहे. जकातला जगातील शासनांच्या कराप्रमाणे एक कर समजू नका, तर खरे पाहता हा इस्लामचा आत्मा आणि त्याचे प्राण आहे. ही वास्तविकतः ईमानची (अल्लाहवरील विश्वास) परीक्षा आहे. ज्याप्रमाणे एक एक वर्गाची परीक्षा देऊन मनुष्य प्रगति करतो, येथपावेतो की शेवटची परीक्षा देऊन 'ग्रॅज्युएट' (स्नातक) बनतो, त्याचप्रमाणे अल्लाहकडूनदेखील कांही परीक्षा आहेत, ज्यांतून माणसाला जावे लागते. जेव्हां तो चौथी परीक्षा, म्हणजे संपत्तीच्या त्यागाची परीक्षा चांगल्याप्रकारे उत्तीर्ण होतो तेव्हां तो पूर्ण मुसलमान बनतो. जरी ही शेवटची परीक्षा नाही, यानंतर अधिक कठीण परीक्षा प्राणाच्या त्यागाची येते, जिचे मी पुढे वर्णन करीन. परंतु इस्लामच्या वर्तुळात अथवा अन्य शब्दात सांगावयाचे म्हटले तर अल्लाहच्या पक्षात येण्यासाठी प्रवेशाकरिता ज्या परीक्षा मुक्रर केल्या गेल्या आहेत त्यापैकी ही अंतिम परीक्षा होय. हल्ली कांही लोक असे म्हणतात की खर्च करण्याबद्दल व पैसे पाण्याप्रमाणे वाहविण्याबद्दल तर अनेक प्रवचने मुसलमानांना ऐकविले गेले आहेत. आता या गरीबी व दरिद्री अवस्थेत तर त्यांना कमविणे व संपत्ती संचय करण्याविषयी प्रवचने ऐकविली पाहिजेत. परंतु त्यांना कल्पना नाही

की ही गोष्ट जिच्याबद्दल ते अप्रसन्नता व्यक्त करतात. वास्तविकतः हीच इस्लामचा आत्मा आहे आणि मुसलमानांना ज्या गोष्टीने पतन व अपमानाच्या खड्ड्यात घातले आहे ती वास्तविकतः याच आत्म्याची उणीव आहे. मुसलमानांचे पतन यामुळे झाले नाही की या आत्म्याने त्यांना पाडले आहे तर ते यामुळे पडले की हा आत्मा त्यांच्यातून निघून गेला आहे.

आगामी प्रवचनात मी आपणास सांगेन की जकात व सदकात (दान) वास्तविकतः आमच्या सामूहिक जीवनाचा प्राण आहे आणि त्यात आमच्यासाठी केवळ परलोकाच्याच नव्हे तर जगाच्या सुद्धा सर्व देणग्या एकत्रित केल्या गेल्या आहेत.

# सामूहिक जीवनात जकातचे स्थान

इस्लामी बंधुनो! यापूर्वीच्या दोन प्रवचनांत जकातची वास्तविकता मी आपल्याला विशद करून सांगितली आहे. आज मी तिच्या दुसऱ्या पैलूवर प्रकाश टाकीन.

## अल्लाहची कृपाशीलता

दिव्य कुरआनमध्ये जकात व सदकात (दान) साठी जागोजाग ***"इन्फ़ाक़ फ़ी सबीलिल्लाह"***चा शब्द-प्रयोग केला गेला आहे. त्याचा अर्थ आहे– "अल्लाहच्या मार्गात खर्च करणे." कांही कांही ठिकाणी असेही सांगितले गेले आहे की, जे कांही तुम्ही अल्लाहच्या मार्गात खर्च करता ते अल्लाहवर *"क़र्जे हसना"* आहे. जणु तुम्ही अल्लाहला कर्ज देता, अल्लाह तुमचा कर्जदार बनतो. पुष्कळ ठिकाणी असेही सांगितले आहे की अल्लाहच्या मार्गात जे कांही तुम्ही खर्च कराल त्याचा मोबदला अल्लाह देईल. आणि तो केवळ तितकीच फेड करणार नाही तर त्यापेक्षा अधिक परत देईल. या गोष्टीचा विचार करा. काय पृथ्वी व आकाशाच्या स्वामीला आपल्या कर्जाची आवश्यकता आहे? काय तो आपला मोताद आहे? काय तो राजांचा राजा महाराजा, अगणित व असंख्य खजिन्यांचा स्वामी स्वतःसाठी आपल्याकडून कांही मागतो? कदापि नाही. त्याच्याच देणग्यांवर तर आपले पालनपोषण होत आहे. त्यानेच दिलेली रोजी तर आपण खाता. आपल्यापैकी प्रत्येक श्रीमंत व गरीबाजवळ जे कांही आहे ही त्याचीच तर देणगी आहे. आपल्यापैकी एका भिकाऱ्यापासून एका कोट्याधीश व अब्जाधीशपर्यंत प्रत्येकजण त्याच्या कृपेची याचना करणारा आहे आणि तो कुणाकडूनही अपेक्षा करीत नाही. त्याला काय गरज आहे की त्याने आपल्याकडून कर्ज मागावे व आपल्या स्वतःसाठी आपल्यासमोर हात पसरावे? वास्तविकतः हादेखील त्याचा कृपाळूपणा आहे की तो आपल्याकडून स्वतः आपल्याच लाभासाठी आपल्याच कल्याणासाठी, आपल्याच कामात खर्च करण्यास तर तो सांगत आहे आणि म्हणतो की, हा खर्च माझ्या मार्गात आहे, माझ्यावर कर्ज आहे, त्याचा मोबदला देणे माझी जबाबदारी आहे आणि मी तुमचा कृतज्ञ आहे. तुम्ही आपल्या जातीतील मोतादांना व गरिबांना द्या.

त्याचा मोबदला ते गरीब कोठून देऊ शकतील? मी त्यांच्याकडून देईन. तुम्ही आपल्या गरीब नातेवाईकांना सहाय्य करा. ते उपकार त्यांच्यावर नसून माझ्यावर आहे. मी तुमचे हे उपकार फेडीन. तुम्ही आपल्यापैकी अनाथ, विधवा, विकलांग, प्रवाशी व संकटग्रस्त बंधूंना जे कांही द्याल ते माझ्या हिशेबात लिहून ठेवा. त्या कर्जाची मागणी त्यांच्याकडून नव्हे तर माझ्याकडे करा आणि मी ते देईन. तुम्ही आपल्या त्रस्त बंधूंना कर्ज द्या आणि त्यांच्याकडे व्याजाची मागणी करू नका, त्यांना त्रस्त करू नका, जर ते परतफेड करू शकले नाहीत तर त्यांची तुरुगात रवानगी करू नका, त्यांना स्वतःचे कपडे व घरातील भांडी व चीजवस्तु विकण्यास भाग पाडू नका. त्यांच्या मुला-बाळांना घरातून बेघर करू नका. तुमच्या कर्जाला ते जबाबदार नाहीत, तर मी आहे. जर त्यांनी मूळ रक्कम अदा केली तर मी त्यांच्याकडून व्याज अदा करीन आणि जर ते मूळ रक्कम व व्याज अदा करण्यास असमर्थ ठरले तर मी मूळ रक्कम व व्याज दोन्ही त्यांच्याकडून तुम्हाला देईन. अशाचप्रकारे आपल्या जमाअतच्या कल्याण कार्यात, आपल्या मानव बंधूंच्या कल्याणासाठी जे कांही तुम्ही खर्च कराल, त्याचा लाभ जरी तुम्हाला मिळाला असला, तरी त्याचे उपकार माझ्यावर राहील. मी त्यापैकी प्रत्येक पै न पै तुम्हाला लाभासह परत करीन.

असा वैभवशाली आहे तो, कृपाळूंचा कृपाळू व राजांचा राजा महाराजा! तुमच्याजवळ जे कांही आहे ते त्यानेच प्रदान केले आहे. तुम्ही इतर कोठून आणलेले नाही. त्याच्याच खजिन्यातून घेता आणि मग जे कांही देता ते त्याला देत नाही तर आपल्याच नातेवाईकांना, आपल्याच बंधूंना, आपल्याच जातीच्या लोकांना देता अथवा आपल्या सामुदायिक कल्याणासाठी खर्च करता की परिणामतः ज्याचा फायदा तुम्हालाच मिळतो. परंतु त्या खऱ्या दानीला पहा की जे कांही तुम्ही त्याच्याकडून घेऊन-घेऊन आपल्यासंबंधितांना देता, त्याला तो म्हणतो की तुम्ही ते मला दिले आहे, माझ्या मार्गात दिले आहे, मला कर्जाऊ दिले आहे, मी त्याचे फळ तुम्हाला देईन. जगाधिपति अल्लाहलाच हे कृपेचे वैभव शोभून दिसते. त्याच निरपेक्ष सम्राटाचे हे श्रेष्ठत्व आहे की ज्यातून हे दातृत्व व कृपेच्या या उच्चतम बिंदूचे प्रकटन होते. कोणताही मनुष्य या उच्चतम विचारसरणीची कल्पनादेखील करू शकणार नाही.

## खर्च करण्याबद्दल उपदेशाची गरज काय?

बरे आता या गोष्टीचा विचार करा की महान अल्लाहने माणसांना पुण्यकर्म व औदार्यासाठी प्रेरित करण्याची ही पद्धत का अवलंबिली? या प्रश्नाचा आपण जितका अधिक विचार करांल तितका अधिक आपल्याला इस्लामी शिकवणीच्या पावित्र्याचे रहस्य उघड होईल आणि आपले मन ग्वाही देत राहील की असे अनुपम शिक्षण अल्लाहशिवाय अन्य कोणाकडून प्राप्त होणे शक्य नाही.

## मनुष्य स्वार्थी बनला आहे.

आपल्याला कल्पना आहे की मनुष्य कांहीसा आपल्या प्रवृत्तीनुसार अत्याचारी व रानटी बनलेला आहे. तो संकुचित दृष्टीचा आहे. तो दूरदर्शी नाही. तो संकुचित मनाचा आहे. तो अधिक महान व उच्च विचार ग्रहण करू शकत नाही. तो स्वार्थी सिद्ध झाला आहे. आपल्या गरजेची सुद्धा एखादी व्यापक कल्पना त्याच्या डोक्यात येत नाही. तो घाई करणारा सुद्धा आहे.

*"खुलिकल इन्सानु मिन अजल."* - *सूरतुल अंबिया : ३७*

त्याला प्रत्येक गोष्टीचा परिणाम व लाभ ताबडतोब हवा असतो आणि त्याच परिणामाला परिणाम व त्याच लाभाला लाभ समजतो जो त्याला लवकर मिळतो. दूरगामी परिणामापर्यंत त्याची दृष्टी पोचत नाही. मोठ्या प्रमाणावर जे लाभ प्राप्त होतात की ज्यांच्या लाभाचा क्रम दीर्घकाळ टिकून राहतो, त्या अगोचर लाभांची त्याला अनुभूति होणे कठीण असते, एवढेच नव्हे तर कांही वेळा अनुभवदेखील होत नाही. हा माणसाचां स्वाभाविक दोष आहे आणि या दोषाचा परिणाम असा होतो की प्रत्येक गोष्टीत तो स्वतःचा फायदा पाहतो आणि फायदाही असा की जो अत्यंत अल्प प्रमाणावर असेल, जो लवकर प्राप्त होईल आणि त्याच्या प्राप्तीचा अनुभव लवकर होईल. तो म्हणतो की जे कांही मी कमविले आहे अथवा जे कांही मला वाडवडिलाकडून मिळाले आहे, ते माझे आहे, त्यात कोणाचीही भागीदारी नाही. ती प्राप्ती माझ्या गरजा भागविण्यासाठी, माझ्या इच्छापूर्तीसाठी, माझ्या भोगविलासावर आणि माझ्या आत्मसंतोषासाठी खर्च झाली पाहिजे, अथवा कमीत कमी इतके तरी व्हावे की माझे नाव व्हावे, माझी कीर्ति वाढावी, माझा सन्मान

व्हावा, मला पदवी मिळावी, उच्च पद प्राप्त व्हावे, लोकांनी माझ्यासमोर नतमस्तक व्हावे आणि त्यांच्या जिभेवर माझी चर्चा असावी. जर यापैकी कोणतीही गोष्ट सिद्ध होत नसेल तर मी माझ्या संपत्तीचा अपव्यय का करावा? जवळच जर एखादा अनाथ भुकेने मरत असेल अथवा एखादा उनाडक्या करीत भटकत असेल तर मी त्याकडे लक्ष का द्यावे? त्याचा हक्क त्याच्या बापावर होता. त्याने आपल्या संततीसाठी आपल्या पाठीमागे कांही ठेऊन जावयास हवे होते. अथवा विमा उतरावयाचा होता. एखादी विधवा जर माझ्या गल्लीत कष्टात दिवस काढीत असेल तर मला त्याचे काय? तिच्या पतीने अगोदरच ही काळजी घ्यावयास हवी होती. जर एखादा वाटसरू भटकत फिरत असेल तर माझा त्याच्याशी काय संबंध? त्या मूर्खाने आवश्यक तयारी केल्याशिवाय घरातून बाहेर का पडावे? एखादा मनुष्य जर त्रस्त असेल तर असू द्या. त्यालासुद्धा अल्लाहने माझ्याप्रमाणेच हात पाय दिलेले आहेत. स्वतःच्या गरजा त्याने स्वतःच भागविल्या पाहिजेत, मी त्याला का मदत करावी? जर मी कांही त्याला देईन तर कर्ज देईन आणि मूळ रकमेबरोबर व्याज सुद्धा वसूल करीन. कारण माझ्याजवळ तर वायफळ धन नाही. मी तो पैसा घर बांधणे, मोटार खरेदी करणे, किंवा एखाद्या फायद्याच्या योजनेत लावू शकेन. हा सुद्धा या पैशापासून निश्चितपणे कांही न कांही फायदा उचलील. मग मी या लाभातून माझा हिस्सा का वसूल करू नये?

## स्वार्थ-बुद्धीचे परिणाम

अशा प्रकारच्या स्वार्थी बुद्धीमुळे प्रथमतः धनिक मनुष्य खजिन्यावरील सर्प बनून राहील आणि जरी त्याने पैसे खर्च केले तरी तो स्वतःच्या लाभासाठी करील. जेथे त्याला स्वतःचा लाभ दिसणार नाही तर तेथे तो एक पैसादेखील खर्च करणार नाही. जर एखाद्या गरीबाला त्याने मदत केली तरी तो खरोखर त्याला मदत करणार नाही तर तो त्याला लुटील आणि जे कांही त्याला दिले आहे त्यापेक्षा कितीतरी जास्त तो त्यांच्याकडून वसूल करील. जर एखाद्या गरीबाला त्याने कांही दिले तरी तो त्याच्या शिरावर उपकाराचा डोंगर ठेऊन त्याला अर्धमेला करून सोडील आणि त्याला इतका अपमानित व तिरस्कृत करील की त्याच्यात स्वाभिमानाचा लेशमात्र उरणार नाही. जर एखाद्या सामाजिक कार्यात त्याने भाग

घेतला तर तो असे पाहील की त्यात मला किती लाभ होणार आहे. ज्या कार्यात त्याला वैयक्तिक लाभ मिळणार नाही त्याला त्याचे सहाय्य मिळणार नाही.

अशा प्रवृत्तीमुळे काय परिणाम होईल? अशा प्रवृत्तींचे परिणाम केवळ सामूहिक जीवनासाठीच विनाशकारी आहेत असे नव्हे तर प्रत्यक्ष त्या माणसासाठीदेखील हानिकारक आहेत जो संकुचित दृष्टीमुळे व अज्ञानामुळे तिला स्वतःसाठी उपयुक्त समजतो. जर लोकांत अशीच प्रवृत्ती असेल तर कांही लोकांजवळ धनसंचय होत जातो आणि असंख्य लोक निर्धन होत जातात. श्रीमंत लोक पैशाच्या जोरावर धन गोळा करीत जातात आणि निर्धन लोकांचे जीवन दिवसेंदिवस असह्य होत जाते. ज्या समाजात गरिबी सामान्य गोष्ट असेल तो समाज तऱ्हेतऱ्हेच्या वाईट गोष्टीत गुरफटून जातो. त्याचे शारीरिक आरोग्य बिघडते, त्यात रोगराई पसरते. त्यात कार्य करण्याची व धनार्जन करण्याची शक्ती कमी होत जाते. त्यात अज्ञान वाढत जाते. त्याच्या चारित्र्याचे पतन होत जाते. तो आपल्या गरजा भागविण्यासाठी गुन्हेगारीचा अवलंब करू लागतो आणि अखेरीस अशी पाळी येते की तो लूटमार करू लागतो. सर्रास दंगेधोपे घडू लागतात. श्रीमंतांना ठार केले जाते. त्यांची घरेदारे लुटली व जाळली जातात आणि त्यांचा अशाप्रकारे विध्वंस व विनाश होतो की त्यांचे नाव-निशाणदेखील शिल्लक राहत नाही.

## समूहाच्या कल्याणात व्यक्तीचे कल्याण आहे.

जर आपण विचार केला तर आपल्या लक्षात येईल की खरोखर प्रत्येक व्यक्तीचे कल्याण त्या समूहाच्या कल्याणाशी निगडित आहे की ज्याच्या क्षेत्रात तिचा निवास आहे. आपल्यापाशी जी संपत्ती आहे, जर आपण त्यापैकी कांही आपल्या इतर बंधूंच्या मदतीसाठी वापरली तर ही संपत्ती भ्रमण करीत करीत अनेक लाभासह पुन्हा आपल्यापाशी परत येईल, आणि जर आपण संकुचित दृष्टीने आपल्याजवळच तिचा साठा करून ठेवाल अथवा केवळ आपल्याच वैयक्तिक लाभासाठी खर्च कराल तर अखेरीस तिचा ऱ्हास होत जाईल. उदाहरणार्थ जर आपण एखाद्या अनाथ बालकाचे पालन-पोषण केले आणि त्याला चांगले शिक्षण देऊन त्याला यायोग्य बनविले की त्याने आपल्या समाजाचा एक कमविणारा पुरुष बनावे तर आपण समाजाच्या संपत्तीत भर घातली आणि हे स्पष्ट आहे की जर

समाजाची संपत्ती वाढेल तर आपल्याला या समाजाच्या संपत्तीत, की ज्या समाजाचे आपण एक सदस्य आहात, कोणत्याही परिस्थितीत वाटा मिळेल, तथापि आपल्याला कोणत्याही प्रकारे हे कळणार नाही की आपल्याला हा वाटा त्या विशिष्ट अनाथ मुलाच्या योग्यतेमुळे प्राप्त झाला आहे की ज्याला आपण सहाय्य दिले होते. परंतु जर आपण स्वार्थ व संकुचित दृष्टीचा अवलंब करून असे सांगितले की मी त्याला का सहाय्य करावे? त्याच्या बापाने त्याच्यासाठी कांही न कांही ठेवले पाहिजे होते, तर तो उनाडक्या करीत फिरत राहील, तो एक बेरोजगार मनुष्य बनून राहील. त्याच्यात अशी पात्रता येणारच नाही की त्याने आपल्या परिश्रमाने समाजाच्या अथवा समूहाच्या संपत्तीत कांही भर टाकावी. एवढेच नव्हे तर आश्चर्य वाटणार नाही जर तो अपराध करणारा बनला आणि एखादे दिवशी त्याने आपली घरफोडी केली. याचा अर्थ असा झाला की आपण आपल्या समाजाच्या एका माणसाला बेरोजगार, उनाड व अपराधी बनवून केवळ त्याचेच नुकसान केले नाही तर स्वतः आपलेदेखील नुकसान करून घेतले. या एका उदाहरणाला लक्षात ठेऊन जर आपण विशाल दृष्टीने विचार केला तर आपल्याला कळेल की जो मनुष्य निःस्वार्थपणे समाजाच्या कल्याणासाठी पैसा खर्च करतो त्याचा पैसा जाहिरपणे तर त्याच्या खिशातून निघून जातो, परंतु बाहेर तो पैसा वाढतो व पल्लवित होत जातो, येथपावेतो की अखेरीस तो असंख्य लाभासह त्याच्याच खिशात परत येतो ज्यातून तो निघून गेला होता. जो मनुष्य स्वार्थ व संकुचित दृष्टीने पैसा आपल्या जवळच साठा करून ठेवतो आणि समाजाच्या कल्याणाखातर खर्च करीत नाही तो जाहिरपणे तर आपला पैसा सुरक्षित ठेवतो अथवा व्याज खाऊन त्याच्यात वाढ करतो. परंतु वास्तविकतः आपल्या मूर्खपणामुळे तो आपल्या संपत्तीचा ऱ्हास करतो आणि आपल्याच हाताने तो आपल्या विनाशाची सामग्री एकत्रित करतो. याच रहस्याची उकल महान अल्लाहने पवित्र कुरआनमध्ये अशा प्रकारे केली आहे—

*"अल्लाह व्याजाचा सत्यानाश करतो व दानाची वाढ करतो."*

*- सूरतुल बकरह : २७६*

*"तुम्ही जे व्याज देता ते अशासाठी की लोकांची संपत्ती वाढवावी. तर खरे पाहता अल्लाहच्या दृष्टीने संपत्तीत अशाप्रकारे वाढ होत नाही, तथापि जी जकात तुम्ही केवळ अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी*

*घाल, ती दुप्पट चौपट होत जाते.''* - *सूरतुर्रुम : ३९*

परंतु हे रहस्य समजणे व त्यानुसार कृति करण्यात माणसाची संकुचित दृष्टि व त्याच्या अज्ञानाचा अडथळा आहे. हा अनुभूतीचा गुलाम आहे. जे पैसे त्याच्या खिशात आहेत ते तर तो पाहू शकतो की त्याच्या खिशात आहेत. जे पैसे कीर्द खतावणीनुसार वाढतात त्याचेदेखील त्याला ज्ञान आहे की खरोखर त्यात वाढ होत आहे, परंतु जे पैसे त्याच्याकडून निघून जातात ते तो पाहू शकत नाही की त्यात कोठे वाढ होत आहे? कशाप्रकारे वाढ होत आहे? किती वाढ होत आहे आणि केव्हा ते पैसे लाभ व नफ्यासह त्याच्याकडे परत येतात. याला तर केवळ असे वाटते की इतके रूपये माझ्याजवळून गेले आणि ते कायमचे गेले.

आजतागायत मनुष्य अज्ञानाची ही गाठ आपल्या बुद्धि अथवा आपल्या प्रयत्नाने खोलू शकला नाही. जगात सर्वत्र हीच स्थिती आहे. एकीकडे तर भांडवलदारांचे जग आहे की जेथे सर्व कामे व्याज खाण्याने चालतात आणि संपत्तीचे वैपुल्य असूनदेखील दिवसेंदिवस संकट व त्रासांत वृद्धीच होत चालली आहे. दुसरीकडे एक असा गट निर्माण झालेला आहे आणि वाढत चालला आहे ज्याच्या हृदयात ईर्ष्येचा अग्नी जळत आहे आणि जो भांडवलदारांच्या खजिन्यावर दरोडा घालण्याबरोबरच मानवी सभ्यता व संस्कृतीचा पटच उलथून टाकू इच्छितो.

## अडचणींची सोडवणूक

या पेच व अडचणींना त्या विवेकी व बुद्धिमान व्यक्तित्वाने सोडविले आहे जिच्या पवित्र ग्रंथाचे नाव पवित्र कुरआन आहे. या कुलुपाची किल्ली म्हणजे अल्लाहवरील श्रद्धा व अंतिम दिनावरील विश्वास आहे. जर माणसाने अल्लाहवर ईमान (विश्वास, श्रद्धा) आणले आणि हे समजून घेतले की पृथ्वी व आकाशातील खजिन्यांचा खरा मालक अल्लाह आहे, आणि मानवी मामल्यांचा प्रबंध वास्तविकतः अल्लाहच्याच हातात आहे, अल्लाहजवळ प्रत्येक कणाचा हिशेब आहे आणि माणसाच्या सर्व सत्कृत्यांचे व दुष्कृत्यांचे अंतिम सुफळ व शिक्षा योग्य प्रकारे हिशेबाप्रमाणे परलोकात मिळेल. तर त्याच्यासाठी हे अत्यंत सोपे आहे की त्याने स्वतःच्या दृष्टीवर विश्वास ठेवण्याऐवजी अल्लाहवर विश्वास ठेवावा आणि आपल्या

संपत्तीचा विनियोग अल्लाहच्या आदेशाप्रमाणे करावा, आणि त्यात जो नफा-तोटा होणार आहे तो अल्लाहवर सोडून द्यावा. अशा श्रद्धेने तो जे कांही खर्च करील वास्तविकतः तो ते अल्लाहला देईल. त्याचा हिशेबसुद्धा अल्लाहच्या कीर्द खतावणीत लिहिला जाईल. मग जगातील कोणालाही त्याच्या उपकाराचे ज्ञान होवो की न होवो, परंतु अल्लाहला ते अवश्य कळेल आणि त्याबद्दल कोणी कृतज्ञ होवो की न होवो अल्लाह अवश्य कृतज्ञ होईल. अल्लाहने जर हे वचन दिले आहे की तो त्याचा मोबदला देईल तर हे निश्चित आहे की तो त्याचा अवश्य मोबदला देईल. मग हा मोबदला तो जगात देईल किंवा परलोकात अथवा दोहोंमध्ये देईल.

# अल्लाहच्या मार्गात
# खर्च करण्याबद्दलचे आदेश

## आदेशाचे दोन प्रकार :
## सर्वसाधारण व विशेष

इस्लामी बांधवांनो! महान अल्लाहने आपल्या शरीअतची (धार्मिक कायदा) एक पद्धत निश्चित केली आहे की प्रथम तर सदाचार व कल्याण-कार्याची सर्वसाधारण आज्ञादिली जाते जेणेकरून लोकांनी सामान्यपणे आपल्या जीवनात कल्याणाची पद्धत अवलंबावी. त्यानंतर त्या सत्कार्याचे एक विशेष स्वरूप सुद्धा निश्चित केले जाते जेणेकरून त्याचे विशेषकरून पालन केले जावे.

## अल्लाहच्या स्मरणाची सर्वसाधारण आज्ञा

उदाहरणादाखल पहा, अल्लाहचे स्मरण एक सत्कार्य आहे, सर्वात महान सत्कार्य आणि सर्व सत्कार्याचे स्त्रोत. या बाबतीत एक सर्वसाधारण आज्ञा आहे की अल्लाहचे सदैव, कोणत्याही परिस्थितीत, स्मरण ठेवा आणि कधीही त्यापासून गाफिल राहू नका.

*"उभ्या उभ्या, बसल्या बसल्या व पहुडलेल्या स्थितीत अल्लाहचे स्मरण करीत रहा."*
- *सूरतुन्निसा : १०३*

*"आणि अल्लाहचे खूप स्मरण करा की जेणेकरून तुमच्या भाग्यात कल्याण यावे."*
- *सूरतुल अनफाल : ४५*

*"निःसंशय आकाशांच्या व पृथ्वीच्या रचनेत आणि रात्र व दिवसाच्या आळीपाळीने येण्यात त्या लोकांसाठी अनेक निशाण्या आहेत जे बुद्धि बाळगतात, जे अल्लाहला उभ्या उभ्या व बसल्या बसल्या आणि पहुडलेल्या स्थितीत आठवीत असतात आणि जे आकाशांच्या व पृथ्वीच्या रचनेचा विचार करून अनायासे उद्गारतात की हे पालनकर्त्या,*

*तू ही सृष्टी व्यर्थ निर्माण केली नाहीस."*

*- सूरह आलेइम्रान : १९०-१९१*

*"त्या माणसाचे म्हणणे ऐकू नका ज्याचे हृदय आमच्या स्मरणापासून गाफिल असल्याचे आम्हाला आढळले आणि जो आपल्या इच्छांचा पाठलाग करीत आहे आणि ज्याच्या सर्व कार्यांनी सीमोल्लंघन केले आहे."*

*- सूरह कहफ : २८*

या आणि अशा अनेक आयती आहेत ज्यात आज्ञा दिली गेली आहे की, नेहमी सर्व स्थितीत अल्लाहचे स्मरण चालू ठेवा कारण अल्लाहचे स्मरणच ती अशी गोष्ट आहे जी माणसाच्या व्यवहारांना सरळ ठेवते आणि त्याला सरळ मार्गावर टिकवून ठेवते. जर मनुष्य त्याच्या स्मरणाकडून गाफिल झाला रे झाला की कामवासना व शैतानी शंकांनी त्याच्यावर नियंत्रण प्राप्त केले. याचा अनिवार्यपणे असा परिणाम आहे की तो सरळ मार्गावरून भटकून आपल्या जीवनाच्या व्यवहारात तो सीमेचे उल्लंघन करीत राहील.

## अल्लाहच्या स्मरणाबद्दल विशेष आज्ञा

ही होती सर्वसाधारण आज्ञा. आता याच अल्लाहच्या स्मरणाचे एक विशिष्ट स्वरूप ठरविले गेले. नमाज आणि नमाजमधीलदेखील पाच वेळेत कांही रकअते अनिवार्य केली गेली की एके वेळी ज्यांच्यासाठी पाच दहा मिनिटांपेक्षा अधिक वेळ खर्च होत नाही. अशा प्रकारे कांही मिनिटे यावेळी व कांही मिनिटे त्यावेळी अल्लाहचे स्मरण अनिवार्य करण्याचा अर्थ असा नव्हे की केवळ आपण इतक्या वेळेपर्यंतच अल्लाहचे स्मरण करावे आणि बाकीच्या वेळी विसरून जावे, तर याचा अर्थ असा आहे की कमीत कमी इतक्या वेळेपर्यंत तरी आपण अल्लाहचे स्मरण करीत रहावे. बाकीच्या वेळी आपले कामही करीत रहा व त्याबरोबरच अल्लाहचे स्मरणही करीत रहा.

## अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याबद्दल सर्वसाधारण आज्ञा

अगदी अशीच बाब जकातची सुद्धा आहे. यासंबंधी एक सर्वसाधारण आज्ञा आहे व एक विशेष आज्ञा. एक तर असे की कंजुषपणा व संकुचित मनोवृत्तीपासून दूर रहा, कारण हे सर्व दुराचाराचे मूळ व पापाची जननी आहे. आपल्या आचरणात त्या अल्लाहच्या रंगाचे अवलंबन करा जो नेहमी आपल्या सृष्टीवर अनंत व अगणित कृपेची नदी प्रवाहित करीत आहे, वस्तुतः कोणाचाही त्याच्यावर कसलाही अधिकार व दावा नाही. अल्लाहच्या मार्गात जे कांही खर्च करू शकता, ते करा. आपल्या गरजांपैकी शक्यतो बचत करा आणि त्याचा अल्लाहच्या इतर गरजू सेवकांच्या गरजा भागविण्यासाठी विनियोग करा. दीनच्या (धर्माच्या) सेवेत व अल्लाहचा कलमा प्रचलित व प्रसृत करण्यासाठी प्राण व धन खर्च करण्यात मागेपुढे पाहू नका. जर अल्लाहवर प्रेम करीत असाल तर संपत्ती-प्रेमाचा अल्लाहच्या प्रेमासाठी त्याग करा. अशी आहे सर्वसाधारण आज्ञा.

## खर्चाविषयी विशेष आज्ञा

आणि त्याबरोबरच विशेष आज्ञा अशी आहे की जर तुमच्याजवळ इतके धन जमा असेल तर त्यापैकी किमान इतके धन अल्लाहच्या मार्गात अवश्य खर्च करा आणि जर इतके उत्पन्न तुमच्या जमिनीतून निघाले तर त्यापैकी कमीत कमी उत्पन्नाचा इतका भाग तरी अल्लाहला अर्पण करा. याशिवाय ज्याप्रमाणे कांही रकअत नमाज अनिवार्य करण्याचा अर्थ असा नव्हे की केवळ या रकअत अदा करतानाच अल्लाहचे स्मरण करावे व बाकी सर्व काळी त्याला विसरून जावे, त्याचप्रमाणे धनाचा अल्पसा भाग जो अनिवार्य केला गेला आहे अल्लाहच्या मार्गात तो खर्च करावा, याचा अर्थ असादेखील नाही की ज्या लोकांजवळ इतके धन असेल केवळ त्यांनीच अल्लाहच्या मार्गात ख़र्च केले पाहिजे आणि ज्यांच्यापाशी कमी धन असेल त्यांनी आपल्या मुठ्या बंद करून ठेवाव्यात. याशिवाय याचा अर्थ असादेखील नाही की श्रीमंत लोकांवर जितकी जकात अनिवार्य केली गेली आहे, त्यांनी केवळ तितकीच रक्कम अल्लाहच्या मार्गात खर्च करावी. त्यानंतर जर एखादा

गरजू आल्यास त्याला झिडकारून परत पाठवावे, अथवा दीनच्या (धर्माच्या) सेवेची एखादी संधी आल्यास असे म्हणावे की आम्ही तर जकात देऊन मोकळे झालो. आता आमच्यापासून एका पैची सुद्धा आशा बाळगू नका. जकात अनिवार्य करण्याचा अर्थ असा कदापि नाही, तर वास्तविकतः याचा अर्थ असा आहे की कमीत कमी इतके धन तरी प्रत्येक श्रीमंताला अल्लाहच्या मार्गात द्यावेच लागेल आणि त्यापेक्षा ज्याला अधिक देणे शक्य असेल त्याने ते द्यावे.

## खर्च करण्याच्या सर्वसाधारण आज्ञेचे संक्षिप्त स्पष्टीकरण

आता मी आपल्यासमोर प्रथम सर्वसाधारण आज्ञेचे थोडे स्पष्टीकरण करीन, मग दुसऱ्या प्रवचनात विशेष आज्ञेचे वर्णन करीन.

पवित्र कुरआनचे हे वैशिष्ट्य आहे की तो ज्या गोष्टीची आज्ञा देतो त्यातील विवेक व वैशिष्ट्याबद्दल सुद्धा स्वतःच सांगतो, जेणेकरून आज्ञाधारकाला आज्ञेबरोबरच हेदेखील कळावे की ही आज्ञा देण्याचे काय कारण आहे आणि त्याचा काय फायदा आहे. पवित्र कुरआन उघडताच सर्वप्रथम ज्या आयतीवर दृष्टी पडते ती अशी आहे–

## सरळ मार्गावर चालण्यासाठी तीन अटी

***''हा पवित्र कुरआन अल्लाहचा ग्रंथ आहे यात कांही शंका नाही. हा त्या ईशभीरू लोकांना जीवनाचा सरळ मार्ग दर्शवितो जे परोक्षावर ईमान (विश्वास) आणतात, नमाज पढतात व जी रोजी आम्ही त्यांना दिलेली आहे त्यातून खर्च करतात.''*** - : ***सूरतुल बकरह : १ ३***

या आयतीत हा मौलिक नियम सांगितला गेला आहे की जगातील जीवनात सरळ मार्गावर चालण्यासाठी तीन अनिवार्य अटी आहेत.– पहिली परोक्षावर ईमान (ज्यात अल्लाह व परलोक आणि वह्य (ईश्वरी संदेश) सर्वच परोक्षाच्या गोष्टीवर ईमान आणण्याचा समावेश आहे.), दुसरी नमाज कायम करणे आणि तिसरी जी कांही रोजी अल्लाहने दिली आहे त्यातून अल्लाहच्या मार्गात खर्च करणे.

दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे की,–

*"तुम्ही तोपर्यंत पुण्याचे स्थान प्राप्त करू शकत नाही की जोपर्यंत अल्लाहच्या मार्गात त्या वस्तु खर्च करीत नाही की ज्यावर तुमचे प्रेम आहे."*
*- सूरह आले इम्रान : ९२*

आणखी फर्माविले आहे–

*"शैतान तुम्हाला भयभीत करतो की खर्च कराल तर फकीर (भिकारी) व्हाल. तो तुम्हाला लज्जास्पद गोष्ट म्हणजे कंजुषपणाचे शिक्षण देतो."*
*- सूरतुल बकरह : २६८*

यानंतर फर्माविले आहे–

*"अल्लाहच्या मार्गात खर्च करा आणि आपल्या हाताने स्वतःला विनाशात ढकलू नका. (कारण अल्लाहच्या मार्गात खर्च न करण्याचा अर्थ विनाश व विध्वंस आहे.)"*
*- सूरतुल बकरह : १९५*

शेवटी फर्माविले आहे–

*"आणि जे संकुचित मनापासून वाचले त्यांचेच कल्याण होणार आहे."*
*- सूरतुल हश्र : ९*

## जीवन जगण्याच्या दोन पद्धती

या सर्व आयतींवरून कळते की जगात जीवन जगण्याचे दोन मार्ग मनुष्यासमोर आहेत. एक मार्ग तर अल्लाहचा आहे ज्यात पुण्य, चांगुलपणा, कल्याण आणि यश आहे. या मार्गासाठी नियम असा आहे की मनुष्य खुल्या मनाचा असावा. जी रोजी अल्लाहने दिलेली असेल, मग ती थोडी असो की जास्त, त्यापासून स्वतःच्याही गरजा भागवाव्यात, आपल्या बंधूंनादेखील सहाय्य करावे आणि अल्लाहचा कलमा उंचावण्यासाठीदेखील खर्च करावे. दुसरा मार्ग शैतानचा आहे, ज्यात प्रकटपणे तर माणसाला लाभच लाभ दिसतो, परंतु वास्तविकतः त्यात विनाश व विध्वंसाशिवाय अन्य कांही नसते. आणि या मार्गाचा कायदा असा आहे की मनुष्याने धन-संचय करण्याचा प्रयत्न करावा, पै-पैवर प्राण देण्याची तयारी

ठेवावी आणि ती दाताने पकडून पकडून ठेवावी जेणेकरून जरी खर्च झाले तरी केवळ आपल्या स्वतःच्या लाभासाठी व आपल्या मनाच्या इच्छेवर व्हावे.

# अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याच्या पद्धती

आता पहा की अल्लाहच्या मार्गावर चालणाऱ्यासाठी अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याच्या कोणत्या पद्धती सांगितल्या आहेत त्यांचे मी क्रमवार वर्णन करीत आहे.

## १. केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी

सर्वप्रथम अशी गोष्ट आहे की खर्च करण्यापाठीमागे केवळ अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याचा उद्देश असावा. एखाद्याला कृतज्ञ बनविणे अथवा जगात नाव करण्यासाठी खर्च केला जाऊ नये.

*"तुम्ही जे कांही खर्च करता त्यापासून अल्लाहच्या प्रसन्नतेशिवाय तुमचा अन्य कांही उद्देश असत नाही."* - *सूरतुल बकरह : २७२*

*"हे लोकहो, ज्यांनी ईमान आणले आहे! आपले दान उपकाराची जाणीव करून देऊन आणि इजा करून त्या माणसाप्रमाणे व्यर्थ घालवू नका की जो लोकांना दाखविण्यासाठी खर्च करतो आणि अंतिम दिनावर ईमान बाळगत नाही. त्याच्या खर्चाचे उदाहरण तर असे आहे जशी एखाद्या खडकावर माती पडलेली असावी आणि त्यावर जोराच्या पावसाचा वर्षाव झाला तर सर्व माती वाहून जावी आणि केवळ स्वच्छ खडक पाठीमागे उरावा."*

- *सूरतुल बकरह : २६४*

## २. उपकाराची जाणीव करून देऊ नका

दुसरी गोष्ट अशी आहे की एखाद्याला पैसे देऊन अथवा भाकरी खायला घालून किंवा कपडे नेसवून उपकार केल्याचे दाखवू नका आणि असा व्यवहार करू नका की ज्यामुळे त्याच्या मनाला व्यथा होईल.

*"जे लोक अल्लाहच्या मार्गात खर्च करतात आणि मग खर्च करून उपकाराची जाणीव देत नाहीत व व्यथा पोहचवीत नाहीत. त्यांच्यासाठी अल्लाहजवळ मोबदला आहे आणि त्यांना कोणत्याही नुकसानीचे भय व दुःख असणार नाही. उरले ते दान जे दिल्यानंतर त्रास दिला जावा, त्यापेक्षा तर हे अधिक चांगले आहे की याचकाला मृदु व्यवहाराने टाळले जावे आणि त्याला म्हटले जावे की बंधु माफ करा."*

*- सूरतुल बकरह : २६२-२६३*

## ३. उत्कृष्ट माल दिला जावा

तिसरा कायदा असा आहे की अल्लाहच्या मार्गात उत्कृष्ट माल दिला जावा, निवडून वाईट माल दिला जाऊ नये. जे लोक एखाद्या गरीबाला देण्यासाठी फाटके-जर्जर व जुने कपडे शोधून काढतात अथवा भिकाऱ्याला निकृष्टतम अन्न देतात, त्यांना सुद्धा केवळ अशाच मोबदल्याची अल्लाहकडून अपेक्षा केली पाहिजे.

*"हे ईमानधारकांनो, जे कांही तुम्ही कमाविले आहे आणि जे कांही आम्ही तुमच्यासाठी जमिनीतून काढले आहे, त्यापैकी चांगला माल अल्लाहच्या मार्गात द्या. असे करू नये की अल्लाहच्या मार्गात देण्यासाठी वाईटात वाईट मालाचा शोध करावयास तुम्ही लागावे."*

## ४. शक्यतो लपवून दिले जावे

चौथा कायदा असा आहे की शक्यतो लपवून खर्च केले जावे जेणेकरून ढोंग व देखाव्याचे त्यात मिश्रण होऊ नये. जरी उघडरित्या खर्च केले (दिले) तरी त्यात कांही हरकत नाही, तरी लपवून गुप्तरित्या देणे अधिक श्रेयस्कर आहे.

*"जर उघडरित्या दान केले तरी हे सुद्धा चांगले आहे, परंतु जर लपवून गरीब लोकांना दिले तर हे तुमच्यासाठी अधिक चांगले आहे आणि त्यामुळे तुमचे पापक्षालन होते."* *- सूरतुल बकरह : २७१*

## ५. अज्ञानी लोकांना गरजेपेक्षा अधिक देऊ नये

पाचवा कायदा असा आहे की अल्प बुद्धि व अज्ञानी लोकांना त्यांच्या

गरजेपेक्षा अधिक दिले जाऊ नये की ज्यामुळे ते बिघडतील आणि वाईट सवयींना ते बळी पडतील, तर त्यांना जे कांही दिले जाईल ते त्यांच्या पात्रतेप्रमाणे दिले जावे. महान अल्लाह असे इच्छितो की पोटभर जेवण व अंगभर वस्त्र तर प्रत्येक वाईटात वाईट व दुष्टात दुष्ट माणसालादेखील मिळाले पाहिजे, परंतु दारूडे, चंडू व गांजा ओढणारे व जुगारी लफंग्यांना पैसे देता कामा नये.

*''आपला माल की ज्याला अल्लाहने तुमच्याकरिता जीवन व्यतीत करण्याचे साधन बनविले आहे अज्ञानी लोकांच्या हवाली करू नका. तथापि या मालापैकी त्यांना खाण्यास व वस्त्र परिधान करण्यासाठी द्या.''*
*- सूरतुन्निसा : ५*

## ६. कर्जदाराला त्रस्त केले जाऊ नये

सहावा कायदा असा सांगितला आहे की, जर एखाद्या गरीब माणसाची गरज भागविण्यासाठी त्याला 'कर्जे हसन' (असले कर्ज ज्यावर व्याज नसते व ते कर्ज परत केले नाही तरी चालते) दिले गेले तर त्याच्या पाठीमागे तगादा लावून त्याला त्रास देऊ नका तर त्याला इतका अवधी दिला जावा की त्याने ते सहजपणे फेडावे आणि जर असे कळले की खरोखर तो ते कर्ज फेडण्यास असमर्थ आहे आणि तुमच्याजवळ इतकी संपत्ती आहे की तुम्ही ते कर्ज त्याला सहजपणे माफ करू शकता तर कर्ज माफ करणे श्रेयस्कर आहे.

*''आणि जर कर्जदाराची आर्थिक स्थिती चांगली नसेल तर त्याची स्थिती सुधारेपर्यंत त्याला सवड द्या आणि जर सदका (दान) करण्याचे लाभ तुम्हाला माहीत असतील तर सदका (समर्पण) करणे तुमच्या दृष्टीने अधिक चांगले आहे.''*
*- सूरतुल बकरह : २८०*

## ७. दान करण्यात संयम

सातवा कायदा असा आहे की, मनुष्याने दान करण्यात सुद्धा सीमेचे उल्लंघन करता कामा नये. महान अल्लाहचा हा उद्देश नाही की मुला-बाळांचे पोट मारून सर्वकांही दान म्हणून दिले जावे, तर त्याची इच्छा अशी आहे की, साध्या पद्धतीने जीवन व्यतीत करण्यासाठी जितकी गरज माणसाला असते तितकी रक्कम

स्वतःवर व आपल्या मुला-बाळांवर त्याने खर्च करावी आणि जी शिल्लक उरेल ती अल्लाहच्या मार्गात त्याने खर्च करावी.

*"विचारतात की आम्ही काय खर्च करावे? हे पैगंबर (स.) सांगा की, जे आवश्यकतेपेक्षा जास्त असेल." - सूरतुल बकरह : २१९*

*"अल्लाहचे पुण्यशील दास ते आहेत की जेव्हां खर्च करतील तेव्हां व्यर्थ खर्च करणार नाहीत आणि फार काटकसरही करणार नाहीत तर त्यांची पद्धत दोन्ही टोकांदरम्यानची आहे." - सूरतुल फुर्कान : ६७*

*"आपला हात इतका आकडूनही घेऊ नका की जणु गळ्याशी बांधलेला आहे आणि इतका खुलाही करू नका की आशाळभूत दृष्टीने तुम्ही पहात बसावे आणि लोकांनी सुद्धा तुमची निंदा करीत रहावे." - सूरह बनी इस्राईल : २९*

## मदतीस पात्र लोक

शेवटी हेही ऐका की महान अल्लाहने मदत देण्यास योग्य लोकांची संपूर्ण यादी दिली आहे जी पाहून आपल्याला कळू शकेल की कोणकोणते लोक आपल्या सहाय्यासाठी पात्र आहेत आणि कोणाचा हक्क महान अल्लाहने आपल्या कमाईत ठेवला आहे.

*"आपल्या गरीब नातेवाईकाला त्याचा हक्क दे व गरीबाला आणि वाटसरूला." - सूरह बनी इस्राईल : २६*

*"आणि पुण्यशील तो आहे जो अल्लाहच्या प्रेमाखातर आपल्या गरीब नातेवाईकांना आणि अनाथ व दरिद्र लोकांना, प्रवाशांना आणि अशा लोकांना धन देतो की ज्यांच्या माना गुलामी अथवा तुरुंगवासात अडकल्या आहेत." - सूरतुल बकरह : १७७*

*"सद्व्यवहार केला जावा आपल्या आईवडील व नातेवाईकांशी आणि अनाथ, दरिद्र, निकटवर्ती शेजारी व नवखे शेजारी आणि सान्निध्यात बसणारी मंडळी व प्रवासी आणि आपल्या दास-दासींशी." - सूरतुन्निसा : ३६*

''आणि पुण्यशील लोक अल्लाहच्या प्रेमासाठी गरीब, अनाथ व कैद्यांना जेवण घालतात. आणि म्हणतात की आम्ही तुम्हाला केवळ अल्लाहसाठी जेऊ घालीत आहोत. तुमच्याकडून कोणत्याही मोबदल्याची अथवा कृतज्ञता व्यक्त करण्याची अपेक्षा बाळगीत नाही. आम्हाला तर आपल्या अल्लाहचे व त्या दिवसाचे भय वाटते की ज्याच्या तीव्रतेमुळे लोकांचे तोंड अकसून इवलेसे होतील व भुवया चढतील. (म्हणजे प्रलयाचा - अंतिम दिन.)''

- सूरतुद्दहर : ८-१०

''आणि त्यांच्या संपत्तीत हक्क आहे मदत मागणाऱ्यांचा व त्या माणसाचा जो वंचित आहे.''

- सूरतुज्ज़ारियात : १९

''दान त्या गरजू लोकांसाठी आहे जे आपली सर्व वेळ अल्लाहच्या कार्यात खर्च करून अशा स्थितीत घरी परततात की ते आपली रोजी कमविण्यासाठी धावपळ करू शकत नाहीत. त्यांची स्वाभिमानी वृत्ती पाहून अजाण लोकांचा असा ग्रह होतो की ते श्रीमंत आहेत, परंतु त्यांचा चेहरा पाहून आपण ओळखू शकता की ते कसल्या कठीण परिस्थितीत जगत आहेत. ते असले लोक नाहीत की लोकांच्या शरीराला झोंबून झोंबून मागत फिरतील. जे कांही दान तुम्ही द्याल अल्लाहला त्याची खबर मिळेल आणि तो त्याचा बदला देईल.''

- सूरतुल बकरह : २७३

# जकातविषयी विशेष आदेश

इस्लामी बंधुनो! गत प्रवचनात मी आपल्याला अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याविषयीच्या सर्वसाधारण आदेशाबद्दल सांगितले आहे. आता मी या आज्ञेच्या दुसऱ्या भागाचा तपशील सांगत आहे जो जकातशी संबंधित आहे, म्हणजे जो अनिवार्य केला गेला आहे.

## जकातसंबंधी तीन आदेश

जकातसंबंधी महान अल्लाहने पवित्र कुरआनमध्ये तीन ठिकाणी वेगवेगळे आदेश दिले आहेत–

१) सूरतुल बकरह मध्ये फर्माविले आहे–

*"जे शुद्ध धन तुम्ही कमविले आहे आणि जे उत्पन्न आम्ही तुमच्यासाठी जमिनीतून काढले आहे त्यातून अल्लाहच्या मार्गात खर्च करा."*

*- सूरतुल बकरह : २६७*

२) आणि सूरह अनआम मध्ये फर्माविले आहे की, आम्ही तुमच्यासाठी जमिनीतून बागा उगविल्या आहेत आणि शेती उत्पन्न केली आहे म्हणून–

*"त्यातील उत्पन्न जेव्हां निघेल तेव्हां त्यातून खा आणि पिकाच्या कापणीच्या दिवशी अल्लाहचा हक्क काढा."- सूरतुल अनआम : १४१*

या दोन्ही आयती जमिनीच्या उत्पन्नासंबंधी आहेत आणि इमाम अबू हनीफा यांचे अनुयायी मुस्लिम धर्मशास्त्रवेत्ते फर्मावितात की, स्वतः आपोआप येणारे उत्पन्न उदाहरणार्थ– लाकूड, गवत व कळकांना सोडून बाकीच्या जितक्या वस्तु धान्य, भाजी व फळांच्या प्रकारातील निघतील त्या सर्वांतून अल्लाहचा हक्क काढला पाहिजे. हदीसमध्ये (पैगंबरांच्या वचनात) आले आहे की, जे उत्पन्न आकाशातून पडणाऱ्या पावसामुळे येईल त्यात अल्लाहचा हक्क म्हणून दहावा भाग राहील आणि जे उत्पन्न मानवी प्रयत्नाने म्हणजे जलसिंचनाने निघेल त्यात अल्लाहचा हक्क विसावा भाग आहे आणि हा हिस्सा पिकाची कापणी झाल्याबरोबर लागू व अनिवार्य होतो.

३) यानंतर सूरह तौबह मध्ये येते की–

*"जे लोक सोने-चांदी जमा करून ठेवतात आणि त्यातून अल्लाहच्या मार्गात खर्च करीत नाहीत त्यांना करूणाजनक प्रकोपाची सूचना देऊन टाका. त्या दिवसाच्या प्रकोपाची की जेव्हां त्यांचे ते सोने-चांदी अग्नीत तापविले जाईल आणि त्याने त्यांच्या कपाळ, बगल व पाठींना डागले जाईल आणि म्हटले जाईल की ही आहे ती संपत्ती जी तुम्ही आपल्यासाठी गोळा केली होती. आता आपल्या त्या खजिन्याची चव घ्या."* - सूरतुत्तौबह : ३४-३५

मग फर्माविले–

*"सदकात (म्हणजे जकात) अल्लाहतर्फे निश्चित केलेले कर्तव्य आहे, याचकासाठी व गरीबासाठी आणि त्या लोकांसाठी जे जकात वसूल करण्यासाठी नियुक्त केले गेले आहेत आणि त्यांच्यासाठी ज्यांची हृदये जिंकण्याचा हेतु असेल आणि माना मुक्त करण्यासाठी आणि कर्जदारासाठी व अल्लाहच्या मार्गात व प्रवाशासाठी, अल्लाह अधिक जाणणारा व विवेकी आहे."* - सूरतु तौबह : ६०

त्यानंतर म्हटले–

*"त्यांच्या संपत्तीतून जकात वसूल करून संपत्तीला शुचिर्भूत व स्वच्छ करा."* - सूरतुत्तौबाह : १०३

या तिन्ही आयतींवरून असे कळले की जी संपत्ती जमा केली जाईल व वाढविली जाईल आणि त्यातून अल्लाहच्या मार्गात कांहीही खर्च केले गेले नाही तर ती अपवित्र बनते. ती पवित्र (शुद्ध) करण्याची केवळ एकच पद्धत अशी आहे की त्यातून अल्लाहचा हक्क वेगळा काढून त्याच्या दासांना दिला जावा.

हदीसमध्ये आले आहे की जेव्हां सोने व चांदी गोळा करणाऱ्यावर प्रकोपाची धमकी आली, तेव्हां मुसलमान फारच चिंतित झाले कारण याचा अर्थ असा होत होता की स्वतःजवळ एक दिरहमदेखील ठेवले जाऊ नये व सर्व खर्च करून टाकावे. शेवटी हजरत उमर (रजि.) स्वतः पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या सेवेत उपस्थित

झाले आणि लोकांच्या चिंतेबद्दल निवेदन केले. पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले की, महान अल्लाहने तुम्हावर जकात अशासाठी अनिवार्य केली आहे की उरलेली तुमची संपत्ती तुमच्यासाठी शुद्ध व पवित्र व्हावी.

असेच कथन हजरत अबू सईद खुद्री (रजि.) यांनी केले आहे की, पैगंबर (स.) यांनी फर्माविले की, जर तू आपल्या संपत्तीतून जकात दिली आहेस, तर जो हक्क तुझ्यावर अनिवार्य झाला होता तो अदा केला गेला.

वर उल्लेखित आयातमध्ये तर केवळ जमिनीचे उत्पन्न व सोने-चांदीच्या जकातसंबंधी आज्ञा मिळते. परंतु हदीसीवरून असे कळते की व्यापाराचे माल, उंट, गाय आणि शेळयाबद्दलही जकात आहे.

## कांही वस्तूंचे जकात योग्य प्रमाण

चांदीचे जकात योग्य प्रमाण दोनशे दिरहम म्हणजे ५२.५ तोळे होय.

सोन्याचे जकात योग्य प्रमाण ७.५ तोळे.

उंटाचे जकात योग्य प्रमाण ५ उंट.

शेळयांचे जकात योग्य प्रमाण ४० शेळया.

गाईचे जकात योग्य प्रमाण ३० गायी.

व्यापाराच्या मालाचे जकात देण्यायोग्य प्रमाण ५२.५ तोळे चांदीच्या प्रमाणात माल.

ज्या माणसाजवळ इतका माल असेल आणि तो माल एक वर्षापर्यंत तसाच असेल तर त्यातून चाळीसवा भाग जकात म्हणून काढणे अनिवार्य आहे. चांदी आणि सोन्यासंबंधी हनफी पंथाचे लोक म्हणतात की, जर हे दोन्ही वेगवेगळे प्रमाणाइतके नसतील आणि दोन्ही मिळून जर एकाच्या प्रमाणाच्या सीमेपर्यंत त्यांची किंमत पोहचेल तर त्यांच्यातून सुद्धा जकात काढणे अनिवार्य आहे.

## दागिन्यावर जकात

जर सोने-चांदी दागिन्यांच्या रूपात असेल तर हजरत उमर (रजि.) आणि

हजरत इब्ने मसऊद (रजि.) यांच्या मते त्यांची जकात देणे अनिवार्य आहे, आणि इमाम अबू हनीफा (रह.) यांनी हेच वचन गृहित धरले आहे. हदीसमध्ये आले आहे की, पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी दोन स्त्रियांच्या हातात सोन्याचे कडे पाहिले आणि विचारले की "तुम्ही जकात काढता काय?" एकीने उत्तर दिले "नाही." पैगंबर (स.) यांनी फर्माविले, "कायतुला हे आवडेल की कियामतच्या (प्रलय) दिवशी तुला याबद्दल अग्नीचे कडे घातले जावेत?" अशाच प्रकारे हजरत उम्मे सलमा (रजि.) यांचे कथन आहे की, माझ्याजवळ सोन्याचे पैंजण होते. मी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याकडे विचारणा केली "काय हा खजिना आहे?" त्यांनी सांगितले की, "जर यातील सोन्याचे प्रमाण जकात लागू होण्यायोग्य प्रमाणापर्यंत पोहचत असेल व त्याची जकात अदा केली असेल तर हे (खजिना) ठरत नाही." या दोन्ही हदीसवरून असे कळते की सोने-चांदी जरी दागिन्याच्या स्वरूपात असले तरी त्याचप्रमाणे जकात अनिवार्य आहे. ज्याप्रमाणे रोखीच्या स्वरूपात असल्यास आहे. तथापि मौल्यवान जवाहिरे व खड्यांवर जकात नाही.

## जकात घेण्यास पात्र लोक

पवित्र कुरआनमध्ये जकात घेण्यास हक्कदार असलेले आठ लोक सांगितले आहेत.

### १. फकीर

हे ते लोक आहेत ज्यांच्याजवळ थोडे का होईना धन तर असते, परंतु त्यांची गरज भागण्यास पुरेसे नसते. दारिद्र्यात जीवन जगतात आणि कोणापुढे हात पसरत नाहीत. इमाम जुहरी (रह.), इमाम अबू हनीफा (रह.), इब्ने अब्बास (रजि.), हसन बसरी (रह.), अबुल हसन करखी (रह.) आणि अन्य महात्म्यांनी 'फकीर'ची अशीच व्याख्या केली आहे.

### २. मसाकीन (गरीब)

हे फार दुर्दशाग्रस्त लोक असतात. त्यांच्याजवळ आपल्या शरीराच्या गरजा भागविण्यासदेखील कांही नसते. हजरत उमर (रजि.) अशा लोकांनादेखील

'मसाकीन'मध्ये समावेश करतात ज्यांना कमविण्याची शक्ती असते, परंतु रोजगार मिळत नाही.

## ३. आमिलीन अलैहा (सरकारी कर्मचारी)

आमिलीन अलैहा ते लोक होत ज्यांना इस्लामी राज्याने जकात वसूल करण्यासाठी नियुक्त केलेले असते. त्यांना जकातच्या खात्यातून पगार दिला जातो.

## ४. मुअल्लिफतुलकुलूब (इस्लाम समर्थकांचे मन राखण्यासाठी)

याचा अर्थ ते लोक होत ज्यांना इस्लामचे समर्थन करण्यासाठी अथवा इस्लामच्या विरोधापासून रोखण्यासाठी पैसे देण्याची गरज भासावी. तसेच त्यात त्या नवमुस्लिमांचा सुद्धा समावेश आहे की ज्यांना समाधानी ठेवण्यासाठी आवश्यकता असते. जर एखादा मनुष्य आपल्या काफिर जातीला सोडून मुसलमान बनल्यामुळे बेरोजगार व दुर्दशाग्रस्त झाला असेल तर तसेही त्याला सहाय्य करणे मुसलमानांचे कर्तव्य आहे. परंतु जर तो श्रीमंत असेल तरी सुद्धा त्याला जकात दिली जाऊ शकते, जेणेकरून त्याचे मन इस्लामवर दृढ रहावे. हुनैनच्या युद्धप्रसंगी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी गनीमतच्या मालापैकी नवमुस्लिमांना फार मोठा वाटा दिला येथपावेतो की एकेकाच्या वाट्याला शंभर-शंभर उंट आले. अन्सार समाजातील लोकांनी याबद्दल तक्रार केली, तेव्हां पैगंबर (स.) यांनी फर्माविले की, हे लोक अलिकडेच कुफ्र (अनेकेश्वरवाद) मधून निघून इस्लाममध्ये दाखल झाले आहेत. मी त्यांची मने प्रसन्न करू इच्छितो. याच गोष्टीच्या आधारे इमाम जुहरी (रह.) यांनी 'मुअल्लिफतुल कुलूब'ची व्याख्या अशी केली आहे की, "जो ईसाई (ख्रिश्चन) अथवा यहूदी (ज्यू) किंवा एखादा मुस्लिमेतर इस्लाममध्ये दाखल झालेला असेल, मग तो श्रीमंत का असेना."

## ५. फिर्रिक़ाब

याचा अर्थ असा आहे की जो मनुष्य गुलामीच्या बंधनातून मुक्त होऊ इच्छितो त्याला जकात दिली जावी जेणेकरून त्याने आपल्या मालकाला ते धन द्यावे व आपली मान गुलामीच्या जोखडातून मुक्त करावी. सध्या गुलामीची प्रथा नाही,

म्हणून मला वाटते की जे लोक दंड देऊ न शकल्यामुळे कारावास भोगत आहेत त्यांना जकात देऊन त्यांची मुक्तता प्राप्त करण्यास मदत केली जाऊ शकते. हे सुद्धा 'फिर्रिकाब'च्या व्याख्येत मोडतात.

## ६. अलग़ारिमीन

याचा अर्थ ते लोक होत जे कर्जदार आहेत. याचा अर्थ असा नव्हे की एखाद्या माणसाजवळ हजार रूपये असावेत व त्याला शंभर रूपयांचे कर्ज असावे तरी सुद्धा त्याला जकात दिली जाऊ शकते, तर त्याचा अर्थ असा आहे की ज्यावर इतके कर्ज असावे की ते फेडून त्याच्याजवळ जकात लागू होण्यास आवश्यक असलेल्या प्रमाणापेक्षा जर कमी रक्कम शिल्लक रहात असेल तर त्याला जकात दिली जाऊ शकते. इस्लामी धर्मशास्त्रवेत्त्यांनी सुद्धा म्हटले आहे की, जो मनुष्य आपल्या वायफळ खर्च करणाऱ्या वृत्तीमुळे व व्यभिचारामुळे कर्जदार झाला असेल त्याला जकात देणे मक्रूह (इस्लाम धर्माप्रमाणे निषिद्ध नसलेली परंतु चांगली नसलेली गोष्ट) आहे. त्याला कारण असे की तो पुन्हा या भरोश्यावर अधिक धाडसाने व्यभिचार व वायफळ खर्च करील की जकात घेऊन मी कर्ज फेडीन.

## ७. अल्लाहच्या मार्गात

हा सर्वसाधारण शब्द आहे जो सर्व पुण्यकार्यासाठी प्रयुक्त होतो. परंतु विशेषत: याचा अर्थ असा आहे की सत्य धर्माचा ध्वज उंचावण्यासाठी मदत करणे होय. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी फर्माविले आहे की, जकात घेणे कोणत्याही श्रीमंतासाठी योग्य नाही. परंतु जर एखादा श्रीमंत मनुष्य जिहाद (धर्मयुद्ध) साठी मदत मागत असेल तर त्याला जकात दिली पाहिजे. ते अशासाठी की जरी एखादा मनुष्य श्रीमंत असला तरी जिहादसाठी लागणारा असामान्य खर्च तो केवळ आपल्या संपत्तीतून कसा पुरा करू शकेल? या कामात तर त्याला जकात देऊन मदत केली पाहिजे.

## ८. इब्नुस्सबील म्हणजे वाटसरू

जरी प्रवाशाजवळ त्याच्या जन्म ठिकाणी कितीही संपत्ती असली तरी प्रवासात तो मोताद असल्यास त्याला जकात दिली पाहिजे.

# जकात कोणाला द्यावी व कोणाला देऊ नये?

आता प्रश्न उरतो तो असा की वर्णिलेल्या या आठ गटांपैकी कोणत्या मनुष्याला कसल्या परिस्थितीत जकात दिली पाहिजे व कोणत्या स्थितीत देऊ नये. याचाही थोडक्यात तपशील आपल्यासमोर सांगत आहे.

(१) एखादा मनुष्य आपल्या बापाला किंवा आपल्या मुलाला जकात देऊ शकत नाही. पति आपल्या पत्नीला व पत्नी आपल्या पतीला जकात देऊ शकत नाही. यावर इस्लामी धर्मशास्त्र तज्ञांचे एकमत आहे. कांही धर्मशास्त्रवेत्त्यांचे मत असे आहे की, अशा निकटवर्ती संबंधितांना जकात दिली जाऊ नये, ज्यांचे पालनपोषण तुमच्यावर अनिवार्य आहे अथवा तुमचे इस्लामी कायद्यानुसार वारस असतील. तथापि दूरवरचे ते पाहुणे-संबंधी जे जकातचे हक्कदार आहेत, एवढेच नव्हे तर दुसऱ्यापेक्षा ते अधिक हक्कदार आहेत. परंतु इमाम औजाई (रह.) म्हणतात की, जकात काढून आपल्या आप्तेष्ठांनाच शोधत फिरू नये.

(२) जकात केवळ मुसलमानांनाच दिली जाऊ शकते. हा त्यांचाच हक्क आहे. मुस्लिमेतरांचा तो हक्क नाही.

हदीसमध्ये जकातची व्याख्या अशाप्रकारे केली गेली आहे की,– "ती (जकात) तुमच्या श्रीमंताकडून घेतली जाईल व तुमच्यातीलच फकीरामध्ये वाटली जाईल."

तथापि मुस्लिमेतरांना सर्वसाधारण "खैरात" (दान) मधून वाटा दिला जाऊ शकतो, इतकेच नव्हे तर सर्वसाधारण खैरात देताना मुस्लिम व मुस्लिमेतर असा भेदभाव करणे चांगली गोष्ट नाही. असे होता कामा नये की मुसलमानांना तर खैरात दिली जावी आणि मुस्लिमेतर मोताद असल्यास हात रोखले जावेत.

(३) इमाम अबू हनीफा (रह.), इमाम अबू यूसुफ (रह.) आणि इमाम मुहम्मद (रह.) फर्मावितात की, प्रत्येक वस्तीची जकात त्याच वस्तीच्या गरीब लोकांसाठी खर्च झाली पाहिजे. एका वस्तीतून दुसऱ्या वस्तीत जकात पाठविणे चांगली गोष्ट नाही, त्याला अपवाद असा की एकतर त्या वस्तीत जकात घेण्यास कोणी हक्कदार नसावा अथवा दुसऱ्या ठिकाणी (वस्तीत) असले संकट आलेले असावे की

ज्याच्यासाठी दूरदूरहून सहाय्य पोहचणे आवश्यक असावे, उदाहरणार्थ, पूर अथवा दुष्काळ. जवळजवळ असेच मत इमाम मालिक (रह.) व इमाम सुफयान सूरी (रह.) यांचेसुद्धा आहे. परंतु याचा अर्थ असा नव्हे की एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जकात पाठविणे 'नाजायज' (अयोग्य) आहे.

(४) कांही महात्म्यांचे असे मत आहे की ज्या माणसाजवळ दोन वेळच्या जेवणाची सामुग्री असेल त्याने जकात घेऊ नये. कांहीच्या मते ज्याच्याजवळ दहा रूपये, तर कांहीच्या मते साडे बारा रुपये असतील त्याने जकात घेऊ नये. परंतु इमाम अबू हनीफा (रह.) व सर्व हनफी पंथाच्या ज्ञानी मंडळींचे मत आहे की ज्याच्याजवळ पन्नास रूपयांपेक्षा कमी रक्कम असेल तो जकात घेऊ शकतो. त्यात घर, घरातील सामान, घोडा व नोकराचा समावेश नाही. म्हणजे हे सर्व सामान असून सुद्धा ज्या माणसाजवळ पन्नास रूपयांपेक्षा कमी रक्कम असेल तो जकात घेण्यास पात्र आहे. या बाबतीत एक गोष्ट तर आहे कायदा व दुसरी गोष्ट आहे प्राधान्य क्रम, या दोहोंत फरक आहे. प्राधान्य क्रम तर असा आहे की पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी फर्माविले की ज्या माणसाजवळ सकाळ व संध्याकाळच्या जेवणाची तरतूद असेल आणि जर त्याने मागण्यासाठी हात पसरला तर तो स्वतःसाठी अग्नी गोळा करीत आहे. दुसऱ्या हदीसमध्ये आहे की पैगंबर (स.) यांनी फर्माविले आहे की, मला हे अधिक पसंत आहे की एखाद्या माणसाने लाकडे तोडावीत व आपले पोट भरावे. त्यापेक्षा की त्याने मागण्यासाठी हात पसरत फिरावे. तिसऱ्या हदीसमध्ये आहे की ज्याच्याजवळ खाण्यासाठी असेल अथवा ज्याच्यात कमविण्याची शक्ती असेल त्याचे हे काम नव्हे की त्याने जकात घ्यावी. परंतु हे धाडसाचे शिक्षण होय. उरला कायदा तर त्यात एक अंतिम सीमा दर्शविणे आवश्यक आहे की कोठपर्यंत मनुष्य जकात घेण्याचा हक्कदार असू शकतो. हे अन्य हदीसमध्ये आढळते.–

पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी फर्माविले की,– "याचकाचा हक्क आहे जरी तो घोड्यावर स्वार होऊन आला असेल."

एका माणसाने पैगंबर (स.) यांना विचारले की माझ्याजवळ दहा रूपये आहेत, काय मी गरीब आहे? त्यांनी उत्तर दिले, "होय."

एकदा दोन माणसांनी येऊन पैगंबर (स.) यांच्याकडे जकातची मागणी केली.

पैगंबर (स.) यांनी त्यांच्याकडे दृष्टी वळवून त्यांना लक्षपूर्वक पाहिले. मग म्हणाले, "जर तुम्ही घेऊ इच्छिता तर मी देईन, परंतु या मालात श्रीमंत व कमविण्यास योग्य हृष्ट-पुष्ट लोकांचा वाटा नाही."

या सर्व हदीसींवरून कळते की ज्या माणसाजवळ जकात देण्यायोग्य प्रमाणात माल नसेल व त्याच्यापेक्षा कमी असेल तो फकीरांच्या गटात मोडतो आणि त्याला जकात दिली जाऊ शकते. ही दुसरी गोष्ट की जकात घेण्याचा हक्क मुळात खऱ्या गरजूंना पोहचतो.

## जकातसाठी सामूहिक व्यवस्थेची आवश्यकता

जकातविषयक आवश्यक आदेश मी आपणास सांगितले. परंतु या सर्व गोष्टींबरोबरच एक महत्वाची व आवश्यक गोष्ट आणखी अशी आहे की, ज्याकडे आपले लक्ष वेधणे आवश्यक आहे आणि हल्ली मुसलमान ती विसरून गेले आहेत. ती गोष्ट अशी की, इस्लाममध्ये सर्व कार्ये जमाअतच्या व्यवस्थेनुसार होतात. वैयक्तिकतेला इस्लाम पसंत करीत नाही. आपण जर मसजिदपासून अंतरावर असाल व एकट्यानेच नमाज अदा केली तर नमाज होईल, परंतु शरीअत (इस्लामी कायदा) तर अशीच अपेक्षा करतो की जमाअतसह नमाज अदा केली जावी. अशाच प्रकारे जमाअतची व्यवस्था नसेल तर स्वतंत्रपणे वेगळी-वेगळी जकात काढणे व ती खर्च करणे सुद्धा बरोबर आहे. परंतु प्रयत्न मात्र असाच हवा की जकात एकाच केंद्रावर गोळा केली जावी जेणेकरून तेथून ती कायदेशीरपणे खर्च केली जावी. याच गोष्टीकडे पवित्र कुरआनमध्ये इशारा केला आहे, उदाहरणार्थ फर्माविले आहे–

***"महान अल्लाहने पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना फर्माविले की आपण त्यांच्याकडून जकात वसूल करा. मुसलमानांना असे फर्माविले नाही की तुम्ही जकात काढून वेगळी वेगळी खर्च करा."***

अशाच प्रकारे जकात वसूल करणाऱ्या कर्मचाऱ्यांचा हक्क निश्चित करण्यावरूनदेखील हे स्पष्टपणे कळते की जकातची अचूक पद्धती अशी आहे की मुसलमानांच्या इमामने (नेत्याने) ती कायदेशीरपणे वसूल करावी व व्यवस्थित खर्च करावी.

अशाच प्रकारे पैगंबर (स.) यांनी फर्मावले– "मला आज्ञा दिली गेली आहे की, तुमच्यातील श्रीमंतांकडून मी जकात वसूल करावी आणि तुमच्यातील फकीरांमध्ये वाटून टाकावी."

याच पद्धतीची अम्मलबजावणी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) व खुलफाए राशिदीन (पैगंबर (स.) यांच्यानंतरचे ईशभीरू चार खलीफा) यांनी सुद्धा केली. इस्लामी राज्याचे कर्मचारी सर्व जकात गोळा करीत असत आणि केंद्राकडून त्याचे वाटप होत असे. आज जरी इस्लामी राज्य नाही व जकात गोळा करून पद्धतशीरपणे वाटप करण्याची व्यवस्था सुद्धा नाही तरी आपण आपापली जकात वेगळी वेगळी काढून शरीअत (इस्लामी धार्मिक कायदा) प्रमाणे खर्च करू शकता, परंतु सर्व मुसलमानांसाठी हे आवश्यक आहे की त्यांनी जकात गोळा करणे व वाटप करण्यासाठी एक सामूहिक यंत्रणा बनविण्याची काळजी घ्यावी, कारण त्या शिवाय जकातच्या अनिवार्यतेचे लाभ अपूर्णच राहतील.